

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







**संपादक :** प्र०ना० परांजपे

**संपादन-सल्लागार :** अशोक रा० केळकर, कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, आशा मुंडले, द०भि० कुलकर्णी, मॅक्सीन बर्नसन

**संपादन-समिती :** प्र०ना० परांजपे (प्रमुख), नीलिमा गुंडी, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर

**कार्यकारी मंडळ सदस्य व पदाधिकारी :** प्रा० प्र०ना० परांजपे, अध्यक्ष; डॉ० मृणालिनी शहा, प्रा० आनंद काटीकर, कार्यवाह, श्री० विजय पाध्ये, सहकार्यवाह; श्रीमती विजया चौधरी, कोषाध्यक्ष; डॉ०नीलिमा गुंडी, सदस्य; प्रा० रंजना फडके, सदस्य; डॉ० मॅक्सीन बर्नसन, सदस्य; डॉ० प्रभाकर जोशी, सदस्य; डॉ० प्रमोद तलगेरी, सदस्य (स्वीकृत); डॉ० मनोहर जाधव, सदस्य (स्वीकृत).

**लेखन व परीक्षणार्थ पुस्तके पाठविण्याचा पत्ता :** प्र०ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
दूरभाष : (020) 2569 4617 भ्रमणभाष : 94225 09638

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :**
आनंद काटीकर, द्वारा, मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. भ्रमणभाष : 94216 10704

**मुद्रण-स्थळ :** एम०आर० ॲण्ड कं०, सदाशिव पेठ, पुणे 411 030. दूरभाष : (020) 2447 5939

मराठी अभ्यास परिषदेच्या **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट - 93731 04903 विजय पाध्ये - 98220 31963.**

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. जानेवारी २०१०पासून वार्षिक वर्गणी - विद्यार्थ्यांसाठी रु० ७५/-, व्यक्तींसाठी एका वर्षास रु० १००/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ४५०/-, संस्थांसाठी एका वर्षास रु० १५०/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ६५०/-.

(२) मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु० १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु० १००/-. आजीव सदस्यांना 'पत्रिकेचा'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. (पाठवल्यास आपला पत्ता पिनकोड क्रमांकासह न विसरता लिहावा.) धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत रु० ५०/- वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) जानेवारी २०१०पासून जाहिरातीसाठी दर : पूर्ण पान रु० ३,०००/-, अर्धे पान रु० २,०००/-. आवरण-पृष्ठ (क्र० ४ = मलपृष्ठ) रु० ५,०००/-, विशेष रंगीत पृष्ठ रु० १०,०००/-

**प्रकाशन : त्रैमासिक :** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.

**या अंकाची किंमत रु० २५/-**

## अनुक्रमणिका

## आवाहन

१. टपालाने पाठविलेल्या अंकांतील काही अंक गहाळ होतात हा नेहमीचा अनुभव आहे. शक्यतो अंक पुन्हा पाठविला जातो. पण जेव्हा या तक्रारींची संख्या जास्त असते तेव्हा अंक पुन्हा पाठवणेही कठीण होते. पुण्याच्या काही भागांतून - विशेषतः बिबवेवाडी, सिंहगड मार्ग - या भागांतून तक्रारी खूप येतात. यामुळे अंकाची प्रत व टपालखर्च असे दुहेरी नुकसान होते. म्हणून जे सभासद/ वर्गणीदार/कुरियर-सेवेचे वर्षाला रु० ४०/- पाठवतील त्यांना अंक कुरियर-सेवेने पाठविला जाईल. ही व्यवस्था हिवाळा २०११ (जानेवारी २०११) अंकापासून करण्यात येईल. कृपया याची नोंद घ्यावी.

२. वर्गणी मनिऑर्डरने पाठवू नये अशी मुद्रित सूचना देऊनही वर्गण्या मनिऑर्डरने येत राहतात आणि त्यामुळे बरीच गैरसोय व गैरसमज होतात. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या महाराष्ट्र बँकेतील (टिळक मार्ग शाखा, पुणे) बचत खाते क्र० 20057164260 या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वतःचे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वतःकडे ठेवण्यास विसरू नये.

---

## आदरांजली

मराठी भाषेत व मराठी भाषेबद्दल महत्त्वपूर्ण लेखन करणारे पुढील नामवंत साहित्यिक अलीकडेच कालवश झाले.

गो०वि० ऊर्फ विंदा करंदीकर
संस्थेचे आजीव सभासद व हितचिंतक ग०प्र० प्रधान
तारा वनारसे
मं०वि० राजाध्यक्ष
बाळ गाडगीळ
वि०म० कुलकर्णी
(विश्वचरित्र-कोशकार) श्रीराम पांडुरंग कामत.

परिषदेचे अनेक वर्षे सभासद असलेले राजकीय व सामाजिक कार्यकर्ते रा०प० नेने आणि परिषदेला ज्यांनी अडचणीच्या काळात मदत केली असे स०म० गोळवलकर हेही काही दिवसांपूर्वी कालवश झाले.

ह्या सर्वांना मराठी अभ्यास परिषद व 'भाषा आणि जीवन' ह्यांच्यातर्फे आदरांजली वाहण्यात येत आहे.

---

# कवितेची भाषा

प्र०ना० परांजपे

'रत्नाकर' मासिकाच्या जुलै १९२९ अंकामध्ये पृष्ठ ५०२वर (म्हणजे पृ०२वर, कारण पानांना जानेवारी ते डिसेंबरपर्यंत सलग क्रमांक देण्याची 'रत्नाकर'ची पद्धत होती.) अनंत काणेकरांची 'आला खुशीत् समिंदर' ही कविता प्रसिद्ध झाली आहे. कवितेच्या तळटीपेत काणेकरांनी म्हटले आहे की, ''समिंदर...सारख्या एखाद्या रांगड्या शब्दाचा मधून मधून उपयोग फक्त गाणे कोळ्याचे आहे हा भास कायम ठेवण्यापुरताच केलेला आहे.'' याचा अर्थ असा की कवितेत 'रांगडे' शब्द वापरू नयेत असा संकेत रूढ होता. आज शब्दच काय संपूर्ण कविता आणि कवितासंग्रह 'रांगड्या' भाषेत लिहिले जात आहेत.

काणेकरांच्या कवितेचे विश्लेषण बा०सी० मर्ढेकरांनी आपल्या 'वाङ्मयीन महात्मता' (१९४१) या निबंधात केले आणि त्या कवितेत 'लेखनगर्भ आत्मनिष्ठे'चा अभाव असल्याचे दाखवून दिले. कवितेची भाषा, कवितेत व्यक्त होणाऱ्या अनुभवातून उमलायला हवी, ती वरून लादता येत नाही असे मर्ढेकरांचा सिद्धांत सांगतो. कवितेची भाषा बदलते तेव्हा कवितेच्या अंतरंगात - म्हणजे कवीच्या अनुभवात व त्या अनुभवाकडे पाहाण्याच्या कवीच्या दृष्टिकोनात - बदल झालेला असतो. किंवा असे म्हणता येईल की कवितेच्या अंतरंगात बदल झाला असेल तरच कवितेच्या भाषेतील बदल समर्थनीय ठरतो; अन्यथा तो उपरा, कृत्रिम व अल्पजीवी ठरतो.

कवितेच्या भाषेत झालेल्या बदलांची काही उदाहरणे पाहिली तर हा मुद्दा स्पष्ट होईल. १७९८मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'लिरिकल बॅलड्स' या वर्डस्वर्थच्या कवितासंग्रहाने इंग्रजी कवितेत क्रांती घडवली. त्या संग्रहाच्या १८०० साली प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या आवृत्तीला जोडलेल्या प्रस्तावनेत ('प्रिफेस') वर्डस्वर्थने आपल्या दृष्टिकोनाचे विवेचन केले. तेव्हापासून इंग्रजी कवितेत रोमँटिसिझमचे युग सुरू झाले.

मराठी कवितेत अशी क्रांती केशवसुतांनी घडवली. 'काठोकाठ भरू द्या पेला', 'आम्ही कोण म्हणूनी काय पुसता', 'सतारीचे बोल' इ० कवितांनी कवितेच्या आशयाबद्दलच्या तोपर्यंत रूढ असलेल्या संकल्पनांचा धक्का दिला. आशयाप्रमाणे कवितेच्या रूपातही बदल घडून आले. सुनीतासारखा नवा पद्यबंध आला. झपूर्झासारखे नवे शब्द आले. आणि मराठीतही रोमँटिसिझमचा उदय झाला. या

सर्वांच्या मुळाशी तत्कालीन सामाजिक व राजकीय परिस्थिती होती. न्यायमूर्ती रानडे, गोखले, टिळक, आगरकर यांनी घडवून आणलेली राजकीय जागृती, दुष्काळ, प्लेग सारखी संकटे, महात्मा फुले, आगरकर, महर्षी कर्वे यांच्या प्रयत्नांतून सुरू झालेला शैक्षणिक व सामाजिक सुधारणांचा रेटा यांमुळे 'जुने जाऊ द्या'चे वारे वाहात होते. त्यामुळे सामाजिक जीवनातील बदल कवींच्याही मनोवृत्तीवर आघात करत होते.

दुसऱ्या महायुद्धामुळे १९४०नंतर सामाजिक जीवनात मूलभूत बदल घडून आले. शहरांकडे लोटणारे लोंढे, गिरण्यांमुळे वाढलेला कामगारवर्ग, महागाई, अर्थार्जनासाठी बाहेर पडलेल्या मध्यमवर्गीय स्त्रिया, 'चले जाव'ची चळवळ, गांधींजींचे नेतृत्व, डॉ० आंबेडकरांच्यामुळे मागासवर्गीयांत झालेली जाणीवजागृती, आणि सामान्य माणसांचे सुरू झालेले अमानुषीकरण यांमुळे कवींच्या, निर्मितीशील कलाकार व साहित्यिकांच्या जगाकडे, जीवनाकडे व कलेकडे पाहाण्याच्या दृष्टिकोनात बदल झाला. शब्दांच्या 'रांगडे'पणाकडे पाहाण्याची दृष्टी बदलली. हे बदल मर्ढेकरांच्या 'नव'कवितेतून (आणि गाडगीळ-माडगूळकर-गोखले इत्यादींच्या 'नव'कथेतून) व्यक्त झाले. 'टांग', 'टिऱ्या', 'फलाट', 'कांदेवाडी', 'बेकलाइटी' असे शब्द कवितेत आले. मर्ढेकरांच्या कवितेने रोमँटिसिझम नाकारला आणि आधुनिकतावाद, वास्तवतावाद आणि मानवतावाद स्वीकारला. पादाकुलकसारखे साधे, ओघवते मात्रावृत्त स्वीकारले.

मर्ढेकरांनंतरची कविता अतिशय प्रयोगशील झाली. ती मुक्तछंदातून, संवादलयीतून प्रकट होऊ लागली. अरुण कोलटकर, दिलीप चित्रे, नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ इत्यादींनी कवितेच्या आशयात अस्तित्ववाद, अतिवास्तववाद, साम्यवाद यांच्या जीवनधारणेतून होणारे दर्शन मांडले. कवितेच्या सर्व घटकांमध्ये प्रयोग केले आणि कवितेची भाषा आणि लोकभाषा, व्यवहारभाषा यांमधील अंतर पुसून टाकले.

१९९०नंतरच्या कवितेने कवितेच्या भाषेबद्दलच्या वाचकाच्या अपेक्षा नाकारल्या, सभ्यतेची बंधने झुगारून दिली, आणि दुर्बोधतेच्या कक्षा विस्तारल्या असे म्हणता येईल. हेमंत दिवटे, संजीव खांडेकर, सचिन केतकर, सलील वाघ इत्यादींच्या कविता वाचकांना धक्के देत आहेत.

मराठी अभ्यास परिषदेच्या या वर्षाच्या वर्धापनदिनाच्या (एक मे) कार्यक्रमात 'कवितेची बदलती भाषा' या विषयावर परिसंवाद आयोजित करण्यात आला होता. परिसंवादात वाचल्या गेलेल्या निबंधांतील तीन निबंध या अंकात समाविष्ट करण्यात आले आहेत. उरलेले दोन निबंध हातात आले की तेही पुढील अंकांत प्रसिद्ध होतील.

■

# मराठी कवितेची बदलती भाषा

हेमंत गोविंद जोगळेकर

आपण सगळे मराठी भाषा बोलतो-लिहितो. भाषा कालानुसार बदलत जाते. स्थळानुसारही बदलते. साहित्याची भाषाही अशी बदलत आलेली आहे. पण जेव्हा आपण कवितेच्या भाषेचा वेगळा विचार करतो, तेव्हा कवितेची भाषा वेगळी असते असे गृहित धरतो. कवितेची म्हणून काही वेगळी भाषा असते का? या संदर्भात मला पु॰शि॰ रेगे यांची दोन विधाने आठवतात. एक : कवितेला ठाम अशी भाषा नसते. दोन : कविता हीच एक भाषा असते. वरवर पाहता ही दोन विधाने परस्परविरोधी वाटतील. पण ती तशी नाहीत. उपलब्ध भाषा कवी कवितेच्या गरजेप्रमाणे वाकवीत असतो. त्यामुळे कवितेला ठाम भाषा नसते. आपल्या कवितेत कवी नवी भाषा घडवीत असतो. त्यामुळे कविता हीच एक भाषा होऊन जाते. कवीला असे करायची गरज का भासते? कवीला आपल्या शब्दांतून अनुभव प्रतीत करायचा असतो, पण प्रचलित शब्द वापरून वापरून झिजलेले-गुळगुळीत झालेले असतात. म्हणून कवीला नवे शब्द घडवावे लागतात, असलेले शब्द नव्या तऱ्हेने वापरावे लागतात. असे जर असेल तर प्रत्येक कवीची-प्रत्येक कवितेची भाषा वेगळी असेल. तिच्यात होणारे बदल कविसापेक्ष किंवा कवितासापेक्ष असतील. मग समग्र कवितेची अशी काही बदलत गेलेली भाषा असेल का? असेल आणि असते. कारण एका कवीने वापरलेली बदलती भाषा यशस्वी ठरली की अनेक कवी तिला अनुसरतात आणि तशा कवितांची लाटच येते. अशी भाषा एखादा विडंबनकार नेमकी पकडतो. तिचे अतिशयोक्त रूप आपल्या विडंबनकवितेतून सादर करतो आणि या भाषिक लकबी कशी हास्यास्पद होऊ शकतात ते दाखवतो. केशवकुमारांनी केलेले एक विडंबन आहे 'कषायपेयपात्रपतितमक्षिकेप्रत.' चहाच्या पेल्यात पडलेल्या माशीचे हे काव्यमय वर्णन पाहा :

अयि नरांग-मल-शोणित-भक्षिके,
जनु-विनाशक-जंतु-सुरक्षिके,!
असु-परीक्षित-हारक-तक्षिके,
'क्या हुवा अफसोस!' मक्षिके

कवितेत भारदस्त संस्कृत शब्द असलेच पाहिजेत या संकेताची खिल्ली उडविण्यासाठी, केशवकुमार कपात पडलेल्या माशीसाठी जड जड संस्कृत शब्द

वापरतात. माशीचा संबंध ओढूनताणून परीक्षित-तक्षकाच्या पुराणकथेशी जोडतात. आणि तीव्र भावना व्यक्त करण्यासाठी उर्दू शब्द योजण्याची टिंगल करण्यासाठी अफसोसही जाहीर करतात!

संस्कृत ही पूर्वी ज्ञानभाषा होती आणि सामान्य जनांपेक्षा वरच्या पातळीवरून उद्बोधन करण्यासाठी कवी संस्कृत शब्द वापरायचे. आजही वापरतात. पण आज इंग्रजी ही ज्ञानभाषा आणि संपर्कभाषा झाली आहे. त्यामुळे आता इंग्रजी शब्द येतात. शहराची कॉस्मोपॉलिटन संस्कृती दाखवण्यासाठी कधी अख्खी मराठी कविता बंबैया हिंदीतूनही अवतरते!

एकाच मुंबई शहराविषयी लिहिणाऱ्या वेगवेगळ्या कवींच्या कवितांतील भाषा रूढ काव्यभाषेपेक्षा कशी बदलत गेली ते पाहिले तरी या बदलांच्या दिशा दिसू शकतील. सुरुवात मर्ढेकरांनीच केली.

जिथें मारते कांदेवाडी
टांग जराशी ठाकुरद्वारा,
खडखडते अन् ट्रॅम वाकडी
कंबर मोडुनि, चाटित तारा;

आपल्याला जाणवणारे वेगळे काही वाचकांना प्रतीत करताना शहराचे रूक्ष तपशील आणि यंत्रांच्या प्रतिमा मर्ढेकरांनी नव्याने कवितेत आणल्या. या अचेतन गोष्टींना त्यांनी त्यांच्या कवितेत सचेतन केले. टांग मारणारी कांदेवाडी तेव्हाच्या वाचकांना दचकवून गेली. (मर्ढेकरांनंतरच्या अनेक कवींच्या कवितांतून प्रतिमा अधिकाधिक भडक होत गेल्या, पण संवेदनशीलता कमी होत गेली.) वसंत आबाजी डहाके यांच्या महानगरी कवितेतील हा समुद्र पाहा :

समुद्र खिन्न हसतो आणि शिणलेल्या पापण्या मिटून घेतो.
त्याला काळजी वाटते साऱ्यांच्याच बालपणाची
वयस्कांच्या शहरांतील.

हीदेखील चेतनगुणोक्तीच पण किती वेगळ्या भाषेतील!

मर्ढेकरांनी कितीही भडक तपशील दिले असले - भले त्यांच्या कवितेवर अश्लीलतेच्या आरोपाखाली खटला भरला गेला होता तरी - त्यांच्या कवितेतील भाषा बव्हंशी सभ्य होती. आजच्या अनेक कवींनी ही तथाकथित सभ्यता गुंडाळून ठेवलेली आहे. नामदेव ढसाळ आपल्या मुंबईवरच्या कवितेची सुरुवातच

मुंबई, मुंबई, माझ्या प्रिये रांडे

अशी करतात.

विवेक मोहन राजापुरे त्यांच्या 'प्रचंड दगडी शहराची ठसठसती नस' या कवितेत

यार चित्कारतो.
शादी क्या भोसडा करो?
दारिद्र्याच्या पेट्रोलनं
आतवर जळत जाणारी आतडी
कुणाला विकायची?....
यार मागतो उसने पैसे.
अन् वेडसर हसत
घुसतो सपकन् -
ग्रँट रोड स्टेशनालगतच्या मुतारीत,
मी त्याला या प्रचंड दगडी शहराची
पहातो ठसठसती नस होताना.

या प्रचंड दगडी शहराची ठसठसती नस कवितेत पकडण्यासाठी या शहराचीच भाषा वापरणे येथे अपरिहार्य होऊन जाते.

मर्ढेकरांनी या शहराचा बकालपणा ठळक करण्यासाठी आपल्या कवितांत जुन्या गाण्यांचे, संस्कृत सुभाषितांचे विडंबन केले होते.

सर्वे जन्तु रुटिना: । सर्वे जन्तु निराशया: ।
सर्वे छिद्राणि पंचन्तु । मा कश्चित् दु:ख-लॉग् भरेत् ।।

'सर्वेऽपि सुखिनः सन्तु' या मूळ संस्कृत प्रार्थनेतील उदात्त आशयाच्या पार्श्वभूमीवर शहरातल्या जीवनाची क्षुद्रता उठून दिसते. त्यासाठी त्यांनी संस्कृत आणि इंग्रजी दोन्हींची सरमिसळ केली. या शहराची ओंगळ बाजू दाखवणाऱ्या कवितेची सुरुवात सलील वाघ 'आषाढस्य प्रथम दिवसे' अशी करतात.

आषाढस्य प्रथम दिवसे कुर्ल्यापाशी
सकाळच्या प्रसन्न गारव्यात
इतकी माणसं हगायला बसतात निर्विकल्प
सकाळच्या प्रसन्न गारव्यात
त्यातलंच एक गाडीखाली येतं.
सकाळच्या प्रसन्न गारव्यात
आरधा तुक्डा इकडं आरधा तिक्डं
आषाढस्य प्रथम दिवसे कुर्ल्यापाशी

आपली तथाकथित महान संस्कृती आणि शहराचे भीषण वास्तव यांतील विरोध वाघ या भाषिक संकराने अधोरेखित करतात. माणसाचे एखाद्या वस्तूसारखे काड्कन तुकडे होणे प्रत्ययाला आणण्यासाठी ते 'तुक्डा' असा शब्द घडवतात. आजचे अनेक कवी प्रमाण-भाषेऐवजी उच्चारानुसारी भाषा वापरतात. आपल्यादेखत माणसाचे असे 'तुक्डे' झाले तरी न ढळणारी आपली स्थितप्रज्ञता जाणवून देण्यासाठी वाघ पुन्हा आषाढस्य प्रथम दिवसे कडे वळतात.

महानगरांत रुजू घेतलेली मॉल संस्कृती, फोफावणारा चंगळवाद आपली स्वत:ची भाषा घेऊन आजच्या कवितांतून येतो. हेमंत दिवट्यांना थांबताच येत नाही.

थांबताच येत नाही अशा जिन्याच्या
कुठल्यातरी पायरीवरून मी सरकतोय
ब्रॅण्डेड खोके सरकताहेत
लेबलं सरकताहेत
कॅटवॉक पाय सटकताहेत
ॲलनसॉली कुल्ली सरकताहेत
फ्रेश टवटवीत परफ्युम्ड मुली सरकताहेत

संगणक हा आजच्या जीवनाचा भाग झाला आहे. आजच्या अनेक कविता या संगणकीण परिभाषेतून जगणे व्यक्त करतात. जगणे आणि मरणेही.

कुठल्यातरी क्षणी जगण्याचा विमा संपतो
कुठल्यातरी क्षणी आपली नेट होते डाऊन किंवा
आपण आपल्यातून डिस्कनेक्ट करून घेतो जगाला
महाकाय आत्महत्येचा प्रोग्राम हँग होत राहतो
आपल्या मेंदूत
कितीही विचार केला विचार करण्याचा डिलीट
तरीही आपला मेंदू गुंतून पडलेला
एकाच विचारावर डोकं आपटत
आपण बुचकाळून काढतो स्वत:ला
माऊसमेल्या मनात
झपाझप झपाझप बंद करू पाहतो
३६ वर्षं ओपनलेली फाईल

मराठी कवितेच्या बदलत्या भाषेचा हा 'ओपनलेला' लेख येथे तात्पुरता बंद करतो. पण बंद करण्यापूर्वी या लेखातून हाती लागलेले आजच्या मराठी





अनुक्रमणिका

कवितेतले प्रमुख नवे भाषाप्रवाह सेव्ह करून ठेवतो. एक आहे संगणकीय परिभाषेचा, एसेमेस आणि मॉल संस्कृतीचा, इंग्लिश आणि हिंग्लिश शब्दांनी भरलेला. दुसरा आहे स्लँग किंवा असभ्य भाषेचा आणि तिसरा आहे बोलीभाषेचा वापर करणारा - ग्रामीण, प्रादेशिक भाषांतल्या कविताही त्यात आल्या. हे नवे भाषाप्रवाह काहीसे स्थिरावलेले आहेत. त्यांचेही साचे बनू पहात आहेत. हे साचे डिलीट करून त्यांच्या जागी नव्या काव्यभाषेची स्थापना करणारे नवे कवी मराठीत लवकरच उगवतील याबद्दल माझ्या मनात तिळमात्र संदेह नाही!

**लेखातील उद्धृत कवितांश**

१) अयि-नरांग-मल... कषायपेयपात्रपतित मक्षिकेप्रत - केशवकुमार, 'झेंडूची फुलें'
२) जिथें मारते कांदेवाडी... - बा०सी० मर्ढेकर, 'मर्ढेकरांची कविता'
३) उशीरापर्यंत रात्री... समुद्र कोंडून पडलाय - वसंत आबाजी डहाके, 'शुभवर्तमान'
४) मुंबई, मुंबई... मुंबई, मुंबई, माझ्या प्रिय रांडे - नामदेव ढसाळ, 'खेळ'
५) यार चित्कारतो... प्रचंड दगडी शहराची ठसठसती नस - विवेक मोहन राजापुरे, 'सामोरा'
६) सर्वे जन्तु रुटिना:... मी एक मुंगी - बा०सी० मर्ढेकर, 'मर्ढेकरांची कविता'
७) आषाढस्य... आषाढस्य प्रथम दिवसे - सलील वाघ, 'सध्याच्या कविता'
८) थांबताच येत नाही अशा... एक प्रचंड लांबीची बेचैन भिंत आहे. हेमंत दिवटे, 'थांबताच येत नाही'
९) कुठल्यातरी क्षणी... कुणी दिला पासवर्ड रिस्टार्ट व्हायला - हेमंत दिवटे, 'थांबताच येत नाही'

■

हेमलता, 917/19 सी, फर्गसन कॉलेज रस्ता, पुणे 411 004
दूरभाष : (020)2565 5329/भ्रमणभाष : 094235 82565
ई-पत्ता : hemantjoglekar@yahoo.co.in

# मराठी कवितेची बदलती भाषा : उपबोधाख्यान

सलील वाघ

व्यासपीठावरचे माननीय, समोरचे माननीय आणि मित्रमैत्रिणींनो, कवितेची बदललेली भाषा असा जरी विषय आजच्या संयोजकांनी दिला असला तरी मी काही त्या विषयावरचा अधिकारी पुरुष नाही; त्यामुळे मी माझ्या सोयीप्रमाणे तो आल्टर करून घालणार आंहे. त्यात तुमची थोडी गैरसोय झाली तर अगोदरच सॉरी.

तुमच्या सुदैवाने मी भाषाशास्त्रज्ञ नाही. तुमच्या आणि माझ्याही सुदैवाने मी प्राध्यापक नाही. मात्र सगळ्यांच्याच सुदैवाने मी एक कवी नक्की आहे! अर्थातच त्यामुळे कोणतेही विद्वत्तापूर्ण विवेचन करणे, मुद्देसूद बोलणे, मला बंधनकारक नाही. मला ते जमणारही नाही. त्यामुळे कवितेविषयीच्या काही उत्कट, स्वैर बडबडीला (आता चान्स मिळालाय तर) मोकळी वाट करून देणे इतकाच माफक उद्देश ठेऊन तुमच्यापुढे गप्पा मारायला म्हणून मी उभा आहे.

कवीने कवितेबद्दल बोलावं का नाही हा एक महत्त्वाचा प्रश्न असतो. कवीने कवितेच्याच रूपाने बोलावं. कवितेबाहेर बोलू नये, असा एक मतप्रवाह असतो. शमशेरजींची एक ओळ आहे 'बात बोलेगी - हम नहीं'. ते मत प्रमाण मानलं तर मी काहीच बोलायला नको. कारण एकोणीसशे चौऱ्यांशी-पंच्याऐंशी ते दोन हजार नऊ, या पंचवीसेक वर्षांच्या काळात लिहिलेल्या कवितांच्या चार संग्रहांच्या रूपाने मी ते बोलून बसलेलो आहे. ज्यांना समकालीन कवितेची बदललेली भाषा पाहायची आणि अभ्यासायची असेल त्यांनी या चार पुस्तकांपलीकडे जायचीही फारशी गरज नाही. तेवढी चार पुस्तकं जरी वाचलीत तरी आजच्या घडीला पुरेय.

तरीसुद्धा बोलण्यासारखं खूप उरतं. सांगण्यासारखं खूप उरतं. ऐकवण्यासारखं खूप उरतं. सगळं कवितेत मावतं. पण मावतसुद्धा नाही. कविता हा आशयप्रकार असतो. काही कादंबऱ्यांत काव्य असतं. काही कथा, नाटक, सिनेमे, प्रसंग जिथे जिथे संज्ञापन असतं, कम्युनिकेशन असतं, तिथल्या कोणत्याही ठिकाणी काव्य दडलेलं असतं. ते विषाणूसारखं असतं. म्हटलं तर आहे, म्हटलं तर नाही. म्हटलं तर सजीव म्हटलं, तर निर्जीव. कधी पोषक वातावरण मिळून ॲक्टिव्हेट होईल काही नेम नाही. काव्य ही माणसाची मूलभूत प्रेरणा (इन्स्टिंक्ट्) असते. कवितेशिवाय माणूस असूच शकत नाही... हा मुद्दा आता इथेच सोडू... विषयांतरातला आनंद घेऊ...

स्वातंत्र्योत्तर काळात मर्ढेकर-रेगेंच्या कवितांनी कवितेची भाषा बदलली, त्यानंतर थोडासा प्रयत्न वसंत गुर्जर, मनोहर ओक, ढसाळांच्या पिढीने केला, पण कवितेची खरी भाषा बदलली ती माझ्या (म्हणजे नव्वदनंतर प्रकाशित झालेल्या, शीतयुद्धोत्तर) पिढीने. इंदिरा गांधींची हत्या हा भारताच्या राजकारणातलाच नव्हे तर भारतीय मानवसमूहाच्या मानवसंकल्पनेतलाच (महत्त्वाचा) टर्निंग पॉईंट होता. आमच्या पिढीतला प्रत्येक जण आदर, फॅसिनेशन, द्वेष, तिरस्कार यांपैकी कोणत्या ना कोणत्या भावनेने इंदिराजींशी जोडलेला होता. त्यानंतर ग्लासनोस्त-पेरस्त्रोयका आले आणि रशियाचे देशपणच उधळले गेले.' शीतयुद्धही संपले. भारतीय मानसाच्या 'वसुंधरेच्या अर्ध्या अंगा तडा भयंकर' गेल्याची परिस्थिती निर्माण झाली. आमच्या पिढीचं सामाजिक मनोबल खची व्हायला हा घटनाक्रम पुरेसा होता. त्याच काळात अनिर्बंध कल्पनास्वातंत्र्य आणि कमालीची प्रेक्षकसापेक्षता ही दोन तत्त्वे घेऊन माणसाचे जगणे पोखरून काढायला मीडिया पुढे सरसावत होता. त्या सगळ्या सामाजिक इतिहासात जायची गरज नाही; कारण आपल्या सगळ्यांनाच तो माहिती आहे. थोडक्यात, मूल्यांच्या आणि भावनांच्याही उपबोधाचं धरण फुटलं ते इंदिराजींच्या हत्येच्या घटनेपासून! हे जे बोलतोय हे कदाचित आत्मनिवेदनात्मक किंवा आत्मचरित्रात्मकही होत असेल पण खरं आहे.

आजची भाषा ही उपबोधनिर्देशित (सबकॉन्शस-ड्रिव्हन?) भाषा आहे. जी कविता लिहिली जातेय ती उपबोधनिर्देशित भाषेत लिहिली जाते आहे. माणसाच्या बोधविश्वात सोसाट्याने घुसलेल्या या उपबोधाचं पोझिशनिंग कसं आणि कुठे करायचं? याचा प्रश्न भाषेला पडला आहे. अंगावर कोसळणाऱ्या मीडियाच्या धबधब्यातून हे उपबोध आपल्या नाकातोंडात गेलेलं आहे. भाषा जवळपास वाहून गेलेली आहे. भाषेचे फ्रॅगमेंट्स तरंगतायत, पण त्या काड्यांचा ना बुडत्याला आधार ना वाचणाऱ्याला. तुम्ही कुठेही जा. जिथं जाल तिथं भाषा ओसंडून टाकणारा उपबोध आहे. तुम्ही खरेदीला जा, तिथं तुमच्या अनेक सुप्त एषणांना चाळवत कुरवाळत उपबोध हजर आहे. तुम्ही खेड्यात जा तिथं रटरटता उपबोध आहे (तो शहराभिमुख आहे.) उपबोधाधिष्ठित चवचालपणाची लसलस शहरांपेक्षा तालुकाप्लेसला आणि अजून आतल्या खेड्यांतून जास्त आहे. तुम्ही मोबाईल ऑन करा तिथं उपबोध आहे. उपबोधाने प्रमाणव्यवस्थेवर मात कशी केलीय याचं अगदी सोप्पं उदाहरण जर पाह्यचं असेल तर ते मिस-कॉलच्या रूपात बघता येईल. कॉल हा बोध आहे. मिसकॉल हा उपबोध आहे. संज्ञापनासाठी कोणतेही टेक्स्ट न वापरता हा मिस-कॉलचा फंडा मानवी उपबोधातून आलेला आहे. (तो प्रॅग्मॅटिक्स-संदर्भक्षेत्रीय आहे.) मिसकॉल हा कोणत्याही भाषेतून कोणत्याही

भाषेला देता येतो. इतकी मेटॅलँग्वेजीयता गाठण्यापर्यंत या उपबोधाची मजल गेलेली आहे. उपबोधाच्या घटोत्कचाखाली आपण चेंगरत चाललेलो आहोत.

अनेक अनाठायी, अवांच्छित भाषारूपांना, व्यक्तींना, विषयांना आपण नुसते सामोरेच जात नाही तर त्यात भाजले जातो आहोत. आपण सकाळी उठतो तेव्हा सानिया मिर्झा आपल्या आयुष्यात येते, तिचं टेन्शन येतं. मग दूध आणायला गेलो की जातो तिथं चितळे, फडके, खांडेकर, अमूल असे लोक त्यांच्यात्यांच्या ड्रेसकोडमध्ये त्यांचीत्यांची रंगसंगती, संस्कृती घेऊन मौजूद असतात, मग इस्त्रीवाल्याशी, कटिंगवाल्याशी आयपीलवर बोलावं लागतं, ऑफिसला निघालो की सुजलेल्या चेहेऱ्यांचे मवाली फुटाफुटावरच्या फ्लेक्सवर दुःस्वप्नासारखे उभे असतात. हॉटेलं, दुकानं, एकावर एक फ्री बूट, डोसा, ब्रेसियर्स, लिपस्टिक, टायर, चहा, बासमती, बाईक, केरलाआयुर्वेद, मेन्युकार्ड, ड्रायव्हिंग लायसन, एटीएम कार्ड, चाटे क्लासेस अशा अनंत गोष्टी, अनंत माणसं, अनंत व्हॅल्यू सिस्टिम्स झेलत डोक्याचं पूर्ण भजं झाल्यावर आपण ऑफिसात पाय टाकतो. तिथे अनंत फोन, दुसऱ्यांचं फोनवरचं संभाषण, मेल्स, एसेमेस, ब्राऊझिंग, सीडी, रिंगटोन्स अशा अनंत भाषारूपांनी पकून गेल्यावर आपण परत घरी येतो तेव्हा वेगळेच लोक घरात घुसलेले असतात, हे सिरियल-किलर्स-सेलेब्रिटी असतात, सारेगम केकाटणारे बालमजूर असतात, आणि त्या बालमजुरांचं रूपांतर बालगुन्हेगारीत करणारे उडाणटप्पू पालक-प्रेक्षक असतात, न्यूजवाले असतात, सरडे-पाली-डायनॉसॉरवाले असतात, असे अनंत अनैसर्गिक बलात्कार आपल्यावर अहोरात्र होत असतात.... सकाळपासून रात्रीपर्यंत आपण अशा अनेक अवांच्छित गोष्टींना उपबोधात ॲबसॉर्ब करत राहतो आणि बोधात स्थान देत राहतो. ही अनाठायी ॲक्सेसिबिलिटी, हा अवाच्छिंतांचा दिशाहीन मेळा आपली प्रायव्हसी उद्ध्वस्त करून टाकतो. ह्या अवांच्छित उकिरड्यावर आपण डुकरासारखे चरत राहतो. त्याच्याने भाषा बदलते.

उपबोधाच्या रेट्यामुळे शब्दांचं रिशफलिंग होतं. शब्दाचा वर्गसंकर होतो. एका वर्गात वापरले जाणारे शब्द दुसरा वर्ग सहजपणे स्वीकारतो. म्हणजे 'चढला, बूच बसलं, मारली गेली, च्यायला, फक् इट' वगैरे शब्द आता सभ्य लोकांमध्ये आत्मीयतेने, आदरपूर्वक वापरले जातात किंवा आमचा कुरिअरबॉय पटकन म्हणतो ''लै कन्व्हिनियंटेय''.. त्याला 'सोप्पे' हे सुलभ वाटत नाही, 'कन्व्हिनियंट' हे सुलभ वाटते... हे किंवा आमचा परदेशातला डायरेक्टर मला सांगतो ''.. इफ् इट्स ओके... इटस् ओके अदरवाईज, सलील, यू डू सम 'मांडोली' विथ दॅट क्लायंट...'' अशातून आपली भाषा उपबोधाधीन होते.

पूर्वी (शीतयुद्ध काळात) या उपबोधाचं दमन करण्याकडे कल होता, पण आता मार्केटिंग गुरूंपासून ते बापू, बुवा, अम्मांपर्यंत सगळ्यांनाच आपापली प्रॉडक्ट लाँच करायला उपबोधात्मक उन्मादाचा आधार घ्यावा लागतो.

आजच्या कोणत्याही बेबीप्रॉडक्टच्या जाहिरातीतली आई (म्हणजे ती मॉडेल) ही इरॉटिकच असावी लागते. ती चुकूनही ढिली पडून (म्हणजे वात्सल्ययुक्त असून) चालत नाही. किंवा फोनवरून बाळाशी बोलणारा कुठंतरी फॉरेनला तडमडलेला जावई किंवा मुलगा हा नेसेसरीली बर्म्युड्यातला संट्याच असावा लागतो. हा आचरटपणा जाहिरातमान्य, मीडियामान्य होतो, कारण तो आपल्या उपबोधात असतो आणि मीडियामान्यतेतून तो परत आपल्या उपबोधात विसावतो, फरमेंट झालेल्या, ओव्हरफ्लो झालेल्या उपबोधामुळे भाषेला फुटक्या ड्रेनेजचं स्वरूप येतं.

एखाद्या नाटकातलं किंवा सिनेमातलं पात्र प्रेक्षकात येऊन बसावं किंवा प्रेक्षकांनी उठून सिनेमात जावं तसा उपबोध आपल्या बोधविश्वावर स्वार झालेला आहे. तो भाषेच्या, विशेषतः कवितेच्या ड्रायव्हिंग सीटवर बसलेला आहे. आणि आता झक मारत आपल्याला तो नेईल तिथं, नेईल तसं जाणं भाग आहे.

हे चांगलं? का वाईट? हवंय? का नकोय? याची आत्ता इथे चर्चा करत नाही.

पण काही प्रश्न मला पडलेले आहेत त्यांची उत्तरं मला तुमच्याकडून हवीत. असं असतं जनरली की वक्त्याने बोलायचं, श्रोत्यांनी ऐकायचं आणि नंतर श्रोत्यांनी प्रश्न विचारायचे. तर आज आपण हे महाराष्ट्रदिनाच्या दिवशी थोडं बदलूयात. मी प्रश्न विचारीन, तुम्ही उत्तरं द्यायचीत. चार प्रश्न माझ्याकडे आहेत.

एक - या उपबोधनिर्देशित (सबकॉन्शन-ड्रिव्हन) भाषेने आपल्या मानवसंकल्पनेवर परिणाम केले आहेत का? (म्हणजे एकाच वेळी अनेक भूमिकांतून जगणाऱ्या आणि भूमिकाभ्रमाचे पेच झेलत वागणाऱ्या माणसाच्या व्यक्तिमत्त्वावर ही उपबोधनिर्देशित भाषा काय परिणाम करते वगैरे... किंवा न-व्यक्तीची निर्मिती हेही उपबोधक्षेत्रीय भाषेचेच फलित आहे. न-व्यक्ती म्हणजे चॅटविंडो, ब्लॉग्स, पोर्टल्सवरच्या प्रोफाईल्स.. या, न-मानवी माणसांचा समाज, त्यात व्यक्तीचे होणारे न-व्यक्तीकरण हेही उपबोधीय भाषेचेच रूप आहे.) त्याच्याबद्दल तुमचं काय मत आहे?

दोन - या उपबोधाच्या प्रखर झोताने मूल्यसृष्टीवर काय परिणाम केले आहेत? (उदा० ज्या नवभांडवलशाही व्यवस्थेचं कॉस्टकटिंग, मॅनपॉवर रिडक्शन, एका माणसाकडून चार जणांनी कामं करून घेणं हे ध्येय असतं तिथं हरकामेपणाला आता ग्लोरिफाय करुन मल्टिफॅसेटिंग किंवा अष्टपैलूपणा असं म्हणलं जातं... असे अजून काय परिणाम आहेत?)

तीन - या उपबोधाधीन जीवनशैलीने आपल्या भाषासाधनेवर कोणते परिणाम केले आहेत? (भाषेची साधना करावी लागते, तिला व्यक्तिमत्त्व द्यावं लागतं, तिला अभ्यासावं लागतं, तिचे नखरे समजून घ्यावे लागतात. थोडक्यात भाषेशी प्रणय करण्याची कला सुसंस्कृत माणसाकडे असावी लागते... हे करण्याची उसंत आपल्यापासून कितपत हिरावली गेलेली आहे?)

चार - भाषातीत, भाषापूर्व आणि भाषावस्थीय आशयबोधांना उपबोधाच्या धरणफुटीमुळे आपण पारखे होत आहोत का? (कितीतरी अशा गोष्टी असतात की ज्या भाषेच्या आधी असतात, 'भाषेबगैर' कळतात. वारा सुटतो, फुलांचा, झाडांचा, आठवणींचा, मातीचा वास येतो - नंतर शब्द सुचतो, भाषा उमटते. किंवा शब्द सुचूनही नंतर जाणवणाऱ्या गोष्टी उरतात, कथ्य उरतं... या गोष्टी भाषेत उमटोत न उमटोत पण भाषेमुळे या अमूर्त जाणिवांची स्थाननिश्चिती (पोझिशनिंग) होत जाते, त्या लोकेट होतात आणि आपल्या संचिताचा भाग बनतात... हे सगळे उपबोधाधिष्ठित भाषेने हरपेल का? असा प्रश्न आहे.)

या प्रश्नांची उत्तरे मला आज तुमच्याकडून हवीयेत. म्हंजे, मला पडलेले प्रश्न तरी कितपत व्हॅलिड आहेत? का आपला मी येड्यासारखा बोलतोय? हे तुमच्याकडून मला हवंय. माणसाला भाषेचा शोध लागला. त्याला काळाचा शोध लागला. त्याला गुरुत्वाकर्षणाचा शोध लागला. पृथ्वी चौकोनी नसून गोल असल्याचा शोध लागला. मूर्खपणाचा आणि सद्गुणांचा शोध लागला, अणुशक्तीचा शोध लागला, वरकड मूल्याचा शोध लागला. अजून काय फुल्याफुल्याफुल्यांचा एक्सवायझेड शोध लागला... पण या सगळ्यांहून भारी, घेरी आणणारा शोध माणसाला लागलेला आहे तो म्हणजे जिज्ञासेचा. माणसाला लागलेल्या सगळ्या शोधांत श्रेष्ठ शोध कोणता लागला असेल तर तो जिज्ञासेचा.

मी जिज्ञासू आहे म्हणून मला हे प्रश्न पडलेत. तुम्ही जिज्ञासू आहात म्हणून तुम्ही याची उत्तरे शोधायची आणि द्यायची आहेत.

प्रश्नाचा शोध लागणे म्हणजेच जिज्ञासेचा शोध लागणे. तो मला लागला. तुमच्यासमोर मांडला. आता पुढचं तुमच्यावर...

■

ई-पत्ता : saleelwagh@gmail.com

# मराठी कवितेची बदलती भाषा

**नीलिमा गुंडी**

भाषा हा घटक एकीकडे सांस्कृतिक पर्यावरणाचा भाग आहे आणि त्याच वेळी सांस्कृतिक पर्यावरणाविषयीची प्रतिक्रिया देण्याचा मार्गही आहे. व्यक्तीच्या आत आणि बाहेर भाषा असते. आतली भाषा आणि बाहेरची भाषा यांच्यात होणारा संघर्ष, हे आजच्या कवितेच्या अनुभवाचे एक केंद्र आहे. त्यामुळे आज कवितेची भाषा बदलणे अपरिहार्य होत असावे. आज पाश्चात्त्य आणि पौर्वात्य मूल्यांचा संकर आपल्या जीवनशैलीत समाविष्ट आहे. आज आपली भाषाही संकरित ('हिंग्राठी', 'मिंग्लिश' इ०) आहे. प्रसारमाध्यमे व बाजारपेठीय आक्रमणामुळे शब्द ही बाब फारच स्वस्त पद्धतीने विक्रेय गोष्ट बनत आहे. विविध वाहिन्यांवरील सांस्कृतिक कार्यक्रमांच्या पाठीशी असणाऱ्या जाहिराती आता कार्यक्रमांच्या डोक्यावरच बसल्या आहेत! सांस्कृतिक कार्यक्रमांमधील जाहिरातींचा मारा भारतीय काव्यशास्त्रातील कलाकृतीशी तादात्म्य, 'आस्वादव्यापार' या संकल्पना मोडीत काढत आहे. रसिक मनाची ही शतखंडित अवस्था संवेदनशील कलावंताला अस्वस्थ करणे स्वाभाविक ठरते. संवेदनशीलता बधिर करणारी, विचारांना उसंत न देणारी, व्यक्तीच्या आंतरिक विश्वावर व खासगीपणावर आक्रमण करणारी ही तंत्रज्ञानप्रणित संस्कृती अनेक गंभीर प्रश्न निर्माण करीत आहे. तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या 'मोबाईल', 'इंटरनेट' आदी संपर्क-माध्यमांमुळे बाह्यविश्वाचा पसारा एकीकडे वाढत आहे; मात्र दुसरीकडे व्यक्ती अधिकाधिक नगण्य बनत आहे. हे सारे सांस्कृतिक पर्यावरण कवितेबाबत - जिच्यात 'भाषेच्या पोटातील भाषा' कार्यरत असते - अधिकच गंभीर ठरते. त्यामुळे या वास्तवाविषयीची व्याकुळता व उपरोध व्यक्त करणारी भाषा गेल्या दहा वर्षांतील काही कवींनी योजलेली दिसते. भुजंग मेश्राम, अरुण काळे, सलील वाघ, मंगेश नारायण काळे, हेमंत दिवटे, संजीव खांडेकर, वर्जेश सोलंकी, श्रीधर तिळवे, वीरधवल परब, गणेश विसपुते, प्रफुल्ल शिलेदार, बालम केतकर आदींच्या कवितेची भाषा या संदर्भात विचारात घेण्याजोगी आहे.

## काव्यभाषेतील बदल

इंग्रजी शब्द, तसेच मोबाईल व संगणक यांच्याशी निगडित परिभाषा यांचा अतिवापर हे अलीकडच्या कवितेच्या भाषेचे एक वैशिष्ट्य आहे. काही कवींनी हे वैशिष्ट्य हेतूपूर्वक अंगीकारले आहे. खासगीकरण-उदारीकरण यांतून

बोकाळलेला चंगळवाद, तसेच सेझ आदी बाबींविषयीचा उपहास व्यक्त करण्यासाठी अशी भाषा जणू प्रभावी शस्त्र ठरत आहे. उदाहरणार्थ, सलील वाघ लिहितात - 'मी तुझ्या नावाने एकशे एक एसेमेस करीन' ('प्रार्थनेच्या कविता'). येथे ईश्वराला दिलेला हा शब्द अध्यात्मक्षेत्रातील बाजारू वृत्तीला उघडे पाडण्याचे काम करतो. सलील वाघ यांचीच दुसरी एक कविता बालकवींच्या कवितेतील श्रुतयोजनाच्या माध्यमातून उपरोध कसा प्रभावीपणे व्यक्त करते ते पाहण्याजोगे आहे :

'आनंदी आनंद गडे, बिर्याणी खाऊ खमंग' ('सध्याच्या कविता').

संगणकीय परिभाषेचा प्रतिमा या स्वरूपात उपयोग करून स्त्रीविषयी लिहिलेली नीरजा यांची कविता पाहा :

'झूमकडे सरकणारं मन
शर्थीनं मिनिमाईझवर आणते ती
....................
स्वत:च्या नावाची फाईल
उघडत नाही चुकूनही' ('स्त्रीगणेशा').

अरुण काळे यांच्या एका कवितेचे शीर्षकच आहे :

www.हे विश्वचि माझा कटोरा.कॉम' ('ग्लोबलचे गावकूस').

वसंत आबाजी डहाके यांनी आपल्या 'शुभवर्तमान' या कवितासंग्रहात नाटकातील स्वगते, संवाद, वर्तमानपत्रातील वाचकांचा पत्रव्यवहार, दूरदर्शनवरील बातम्यांचे निवेदन, व्यासपीठीय घोषणाबाजी, जाहिरातशैली अशा संज्ञापन व्यवहारातील नव्या प्रस्थापित शैलींचा मार्मिकपणे वापर केला आहे. त्यांनी एका मुलाखतीत ('खेळ', जानेवारी २००८) केलेले एक विधान मला महत्त्वाचे वाटते. ते म्हणतात, ''मी पोएटिकनेस घालवीत नाही. लिरिकॅलिटी घालवतो.'' मला वाटते, आजच्या अनेक कवींपुढे भाषा योजताना हाच पर्याय उपलब्ध आहे.

भाषेविषयीची नवी संवेदनशीलता मंगेश नारायण काळे यांच्या कवितांमधूनही व्यक्त होते. त्यांनी 'आत्महत्या' या कवितेत लिहिले आहे :

'आत्महत्या हा शब्द कुणीही लिहू शकतो.
म्हणजे ज्याला गिरवता येते पहिले अक्षर
किंवा निरक्षर साक्षात ठसा अंगठ्याचा
आत्महत्या हा शब्द'
आता शेतकरी असाही लिहिता येतो. ('नाळ तुटल्या प्रथमपुरुषाचे



अनुक्रमणिका

दृष्टान्त').

हे वाचताना लक्षात येते की कवीच्या लेखी भाषा ही जगण्याचे वर्णन करणारी गोष्ट नाही, तर जगण्याची साक्षात प्रतिमाच आहे. याच वृत्ति-गांभीर्याने लिहिलेल्या त्यांच्या दीर्घकविताही वेगळ्या ठरतात. गद्यासारख्या धाटणीने लिहिलेली, विरामचिन्हविरहित अशी त्यांची 'तालीमखाना' ही दीर्घकविता वाचताना हे जाणवते. एकेकाळी खंडकाव्य, कथाकाव्य या प्रकारात 'पद्य'रचना करुन दीर्घकाव्य आकाराला येत असे. तशी तडजोड यात करावी लागत नाही.

हाच अनुभव वर्जेश सोलंकी यांच्या 'ततपप' हा दीर्घकवितेबाबत येतो. येथेही कवितेचे शीर्षकच भाषिक कोंडीचा अनुभव देते आणि सामाजिक व्यवस्थेत 'मूकनायक' राहिलेल्या अनेकांची व्यथा प्रातिनिधिक रूपात व्यक्त करते. या कवितेत अनेक ओळींमध्ये शब्द न तोडता लिहिण्याची लकब अभिव्यक्तीतील आवेगपूर्णता वाचकांपर्यंत पोहोचवण्यासाठी उपयुक्त ठरते. उदा०

'आता हळूहळू नकळत आपल्याला
एक रिंगण घातलं जातंय आपल्याभवताली
आंधळावकीलटंकलिपिकसाक्षीदारन्यायाधीश
कुणीही यावं टपली मारून जावंचा
सुरूए एक अव्याहत खेळ' ('ततपप').

भाषेच्या उपयोजनात नवप्रतीकनिर्मितीही महत्त्वाची ठरते. सचिन केतकर आपल्या 'दहा दिशा, दहा दशा' या दीर्घकवितेत लिहितात,

'मी पाहू शकतो एका डोळ्याने
किमान दहा चॅनेल्स एका वेळेस
...........
एव्हाना तुमच्या लक्षात आलंच असेल
की ही आजची झगमगीत सुवर्णनगरी
म्हणजे माझं साम्राज्य' ('खेळ', जाफेमा २००९).

येथे 'रावण' ही पौराणिक व्यक्तिरेखा आजच्या चंगळवादी युगाचे प्रभावी प्रतीक बनते.

शहरी, महानगरी वास्तवाप्रमाणेच ग्रामीण वास्तवाचे चित्रण करणारे काही कवीही आपली काव्यभाषा जाणीवपूर्वक बदलत आहेत. संतोष पद्माकर पवार यांचा 'पिढीपेस्तर प्यादेमात' हा कवितासंग्रह हे त्याचे उदाहरण आहे. मुळात संग्रहाच्या शीर्षकस्थानी बखरीतील शब्दयोजना वापरून (जिचा अर्थ आहे -

'वंशपरंपरागत चालत आलेला भोगवटा') कवीने समग्र भाषिक व सांस्कृतिक परंपरेशी असलेला आपला अनुबंध दृढ केला आहे. ग्रामीण वास्तवातील अनेक-पदरी शोषणाचा अनुभव सांगताना कवीने झडती घेणाऱ्या लोकगीत गायकाची भूमिका घेतली आहे. ही भाषिक प्रयोगशीलता लक्षणीय आहे.

**स्त्रियांच्या काव्यभाषेतील बदल**

अलीकडे स्त्रियांच्या कविता वाचतानाही त्यांतील भाषिक वेगळेपण वाचकाच्या मनावर ठसते. १९८०नंतर स्त्रीवादी विचाराचा रेटा जसजसा वाढत गेला, तसतशी स्त्रियांची कविता पारंपरिक भावुक - 'रोमँटिक' - शैलीच्या पकडीतून मुक्त होऊ लागली. इतकी की स्त्रीवादी वैचारिक धारणा नसलेल्या कवयित्रींची भाषाशैली व प्रतिमासृष्टीही बदलताना दिसू लागली. उदाहरणादाखल अरुणा ढेरे यांच्या 'नामानिराळा'या कवितेतील ही प्रतिमा पाहा :

'बलात्काराला सज्ज झालेल्या पुरुषासारखा
शब्द उभा तिच्यासमोर एकएकट्या संध्याकाळी अचानक'
('मंत्राक्षर').

अलीकडच्या काळात स्त्रीच्या जगण्याची परिभाषा जशी बदलत गेली, तसतशी पारंपरिक भाषेला आणि धार्मिक-सांस्कृतिक परंपरेला आव्हान देण्याची धीट वृत्ती तिच्या कवितांमध्ये दिसू लागली. मलिका अमर शेख, रजनी परुळेकर, अश्विनी धोंगडे, प्रज्ञा पवार, नीरजा आदि कवयित्रींच्या कविता वाचताना हे लक्षात येते. या कवितांमधून भाषेतील उपरोध आणि युक्तिवाद कौशल्य जणू पणाला लागत आहे. मलिका अमरशेख एका कवितेत लिहितात :

'रोदानने बाईला विचारात
पडलेली दाखवली नाही कधी
न् व्हॅन गॉगनं तिला
गुडघ्यात मान टेकवून मरणासन्न बसलेली पाहली' ('महानगर').

कविता महाजन यांची 'तात्पुरते' ही कविता प्रस्थापित अभिरुचीला धक्का देणाऱ्या एका प्रतिमेमुळे काही प्रकाशक प्रकाशित करायला तयार नव्हते. शेवटी त्यांनी ती आपल्या 'ग्राफिटी वॉल' या 'लोकप्रभा' साप्ताहिकातील सदरामध्ये एका लेखात प्रकाशित केली. (सदर लेखन आता 'ग्राफिटी वॉल' या पुस्तकात समाविष्ट आहे.)

कविता महाजन यांनी दुसऱ्या एका कवितेत म्हटले आहे,

'आणि माझे मौन हीच किंकाळी

तीक्ष्ण तरबेज शब्दांविरुद्ध' ('तत्पुरुष').

स्त्रीवर शतकानुशतके लादलेल्या मौनाकडे पाहण्याचा पारंपरिक दृष्टिकोनच बदलून टाकणारा हा पवित्रा नक्कीच वैशिष्ट्यपूर्ण आहे.

**काव्यांतर्गत भाषिक प्रदेशाचा विस्तार**

आजच्या काव्यविश्वात विविध बोलींमधून लिहिलेल्या कविता समोर येतात. भुजंग मेश्राम यांनी गोंडी, बंजारी, परधानी, गोरमाटी, वऱ्हाडी, वारली इत्यादी बोलींमधून काव्यलेखन केले आहे. विविध बोलींमधून लिहिलेल्या काही कवितासंग्रहांचा उल्लेख करावयास पाहिजे. उदा० १. महेश केळुसकर - 'मोर' (मालवणी), २. ना०जो० थुटे - 'सपनधून' (झाडी). ३. सुधीर देवरे - 'आदिम तालनं संगीत' (अहिराणी) विविध बोलींचा काव्यभाषा म्हणून स्वीकार होऊ लागल्यामुळे काव्यांतर्गत भाषिक प्रदेश विस्तारताना दिसत आहे. उषाकिरण आत्राम व कुसुम अलाम या आदिवासी कवयित्रींनी त्यांच्या सांस्कृतिक संदर्भातून नवी प्रतिमासृष्टी कवितेत आणली आहे. उषाकिरण आत्राम लिहितात:

'गोंदून निळी, होवू नगं काळी
रानफुलासारखी डवर
हो। सूर्यसळी
हो। नागकमळी' ('म्होरकी').
हे सर्वच चित्र मोठे आश्वासक आहे.

एकंदरीत आजच्या काही कवींचे भाषाविषयक संवेदन सूक्ष्म व तल्लख आहे, हे आवर्जून लक्षात घ्यायला हवे.

■

3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, पुणे 411 002
भ्रमणभाष : 098810 91935



अनुक्रमणिका








# आदिआछिपलेया

ब्रह्मानंद देशपांडे

मराठी भाषेच्या जडणघडणीच्या अभ्यासासाठी प्राचीन मराठी कोरीव लेखांचे महत्त्व इतिहासाचार्य वि०का० राजवाडे यांनी ओळखले होते. या लेखांतील अनेक शब्दांची सखोल चिकित्सा त्यांनी केली आहे. अशाच एका शब्दाचा विचार येथे करायचा आहे.

जैत्र सामंताचा जालगाव ताम्रपट (तालुका दापोली, जिल्हा रत्नागिरी) हा शके ११२४, दुंदुभि संवत्सर, चैत्र शुद्ध प्रतिपदा, आदित्यवार (मार्च १०, १२०२ इ०स०) या तिथीचा आहे. या ताम्रपटाचे संवादन आणि चर्चा खालील विद्वानांनी केली आहे.

अ. मो०गं० दीक्षित, दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, खंड ३, पृ० ६३-६४ आणि काही उत्कीर्ण लेख : नवे पाठ, पृ० १५

आ. आल्फ्रेड मास्टर. सम मराठी इन्स्क्रिप्शन्स, बुलेटिन ऑफ द स्कूल ऑफ ओरिएंटल अॅण्ड आफ्रिकन स्टडीज, पृ० ४२८-३०

इ. शं०गो० तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख. पृ० ९३-९७.

या लेखात 'आदिआछिपलेया' असा शब्द आला आहे. (वाचन ओळ ९-१०) मो०गं० दीक्षित यांनी आपल्या पहिल्या संपादनात या शब्दाची चर्चा केलेली नाही; पण 'काही उत्कीर्ण लेख : नवे पाठ' या पुस्तिकेत मात्र त्यांनी आदिआछिपलेया या वाचनाऐवजी 'आदिआ छिपले [लो] (णा)' असे वाचन दिले आहे. येथे गोल कंसातील अक्षर हे सुधारित वाचन आणि चौकटी कंसातील अक्षर हे कोरक्याच्या हातून सुटलेले अक्षर असे समजायचे असते. यावर त्यांनी छिपलोण (?) याचा अर्थ चिपळूणकंडील असा घेण्यास हरकत नाही, अशी तळटीप दिली आहे (पृ० १५, तळटीप क्र० २). पण दीक्षित यांचे हे विवेचन ग्राह्य वाटत नाही, कारण आदिआछिपलेया हा पाठ स्पष्ट आहे.

आमच्या मते मूळ शब्द 'अक्षपटलिक' असा आहे. पटलावर रकाने (अक्ष) काढून हिशेब लिहिणारा तो अक्षपटलिक. त्याचा अपभ्रंश 'आछिपलेया' हे सहजच जुळते. फक्त प्रश्न राहतो तो आदि (प्रथम) या उपपदाचा. शिलाहारांच्या शासनयंत्रणेत प्रथम हिशेबनीस, द्वितीय हिशेबनीस अशी पदे असत. त्याचे अनेक

उल्लेख शिलाहारांच्या शिलाताम्रशासनात येतात. उदाहरणार्थ पुढील उल्लेख पाहा.

अ. मुम्मुणीराजाचा दिवे आगर ताम्रपट (शक ९७५) : 'द्वितीय च्छेपाटी सेन श्री वावपैय' (वा०वि० मिराशी, शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, शिराकोले; पृ० १३०)

आ. मुम्मुणिराजाचा अंबरनाथ देवालयातील शिलालेख (शक ९८२) : 'प्रथम स्थेपाटि सेनमहादेवैय.' (तत्रैव पृ० १३२)

इ. अपरादित्य (प्रथम) याचा वडवली ताम्रपट (शक १०४८) : 'द्वितीय च्छेपाटि प्रधान श्रीछितमैय प्रभू' (तत्रैव पृ० १४८)

ई. अपरादित्य (प्रथम) याचा चिंत्रा शिलालेख (शक १०५५) : 'प्रथम च्छेपाटी महाप्रधान श्रीलक्ष्मणैय प्रभू द्वितीय च्छेपाटी श्री (अमुक)' (तत्रैव पृ० १५४)

उ. अपरादित्य (प्रथम) याचा चांजे शिलालेख (शक १०६०) : 'प्रथम स्थेपाटि महाप्रधान श्रीलक्ष्मणप्रभो द्वितीय स्थेपाटी सेन श्री (अमुक)' (तत्रैव पृ० १५७)

ऊ. विक्रमादित्याचा पन्हाळे ताम्रपट (शक १०६१) : 'प्रथम च्छेपाटि महाप्रधान श्रीलक्ष्मणैय प्रभो द्वितीय च्छेपाटी + + + +' (तत्रैव पृ० १६६)

ए. अपरादित्य (द्वितीय) याचा परळ शिलालेख प्रथम स्थेपाटि महासांधि विग्रहिक अनंत प्रभू द्वितीय स्थेपाटि श्री अमुक (तत्रैव पृ० १९५)

ऐ. अपरादित्य (द्वितीय) याचा माणिकपुर वसई शिलालेख (शक १११९) : 'प्रथमच्छेपाटी द्वितीय च्छेपाटी तृतीय च्छेपाटी चतुर्थ च्छेपाटी' (मो०गं० दीक्षित; महाराष्ट्रातील काही प्राचीन ताम्रपट व शिलालेख; पृ० ८४)

हे सर्व अधिकारी भांडागार आणि श्रीकरण (अकाउंट्स ऑफिस) यासी संबंधित आहेत. ते अक्षपटलिक आहेत. तेव्हा आदिअक्षपटलिक-आदिआ छिपलेया किंवा प्रथम च्छेपाटी (अक्षपटलिक-च्छपटलिक-च्छेपाटि) अशी शब्दरूपे दिसतात.

■

कुणाल रेग्युलस, सी-801, बालेवाडी, पुणे 411 045
भ्रमणभाष : 099233 90614

# बहुभाषिक भारत - वास्तव आणि स्वप्न

**मॅक्सीन बर्नसन**

मी १२ जून १९६१ रोजी हैदराबादच्या बेगमपेठ विमानतळावर पोहोचले तेव्हा डॉ० शांताबाई सातवळेकर व डॉ० एस०डी० सातवळेकर म्हणजे आई आणि भाऊ मला घ्यायला आले होते. शांताबाईंनी ड्रायव्हरला तेलगूमध्ये काहीतरी सांगितले. मग शेरवानी घातलेल्या एका इसमाशी त्या उर्दूमध्ये बोलल्यां व त्यानंतर भाऊंशी मराठीमध्ये बोलल्या. मग त्या माझ्याकडे वळून म्हणाल्या, ''We'll teach you three languages.'' माझ्या बाबतीत त्यांचा वायदा काही अंशी अपुरा राहिला तरी त्या दिवशी हैदराबादमधील बहुभाषिकतेचा ठळक अनुभव आला होता, हे निश्चित आहे.

दुसरा अनुभव १५ दिवसांनंतर आला. मी मैत्रिणीबरोबर रायचूरच्या जवळ असलेल्या गुरुगुंटा नावाच्या खेड्याला गेले होते. तिकडच्या घरात एक १५-१६ वर्षांचा नोकर होता. त्याचे शालेय शिक्षण अजिबात झालेले नव्हते; पण त्याला ४-५ भाषा बोलायला येत होत्या. कन्नड, तेलगू, तामिळ, हिंदी, उर्दू. अवतीभवती घडत असलेल्या गोष्टी बघत मी थोडंफार आकलन करण्याचा प्रयत्न करीत होते, हे त्यांनी पाहिले. मग मला सांगण्यात आले की, त्याने माझ्याबद्दल कॉमेंट केली. ''तिच्या शिक्षणाचा काय उपयोग आहे? तिला बोलताही येत नाही.''

मी मूळ अमेरिकेची आहे हे तुम्हांला माहीत आहे. लहानपणापासून जी भाषेची स्थिती मी अनुभवली ती हैदराबादच्या किंवा एकूण भारताच्या स्थितीपेक्षा फारच निराळी होती. जन्मापासून निधनापर्यंत एकच भाषा - म्हणजे इंग्रजी पुरेशी होती. दुसरी भाषा शिकण्याची गरज नव्हती. कॉलेजमध्ये जाऊ इच्छिणाऱ्या मुलांना माध्यमिक शाळेमध्ये एक परकीय भाषा शिकायची होती. बहुधा स्पॅनिश, फ्रेंच किंवा जर्मन; पण शाळेच्या बाहेर त्या भाषेची गरज नव्हती व मुलांनी त्या भाषेवर फारसे प्रभुत्व मिळवावे, अशीही अपेक्षा नव्हती.

ही एकभाषिक स्थिती पूर्वी अमेरिकेमध्ये नव्हती. आदिवासी सोडून बहुसंख्य अमेरिकेतील लोक एकेकाळी इतर देशांमधून आले होते. काही शतकांपासून लोक युरोपमधून व जगाच्या इतर भागांमधून येत राहिले. आपली भाषा घेऊनच. पुष्कळदा विशिष्ट भाषिक लोक एकाच ठिकाणी स्थायिक व्हायचे म्हणून ते आपली

भाषा बोलत असत. चर्च व इतर भाईबंद संस्था स्थापन करून त्यांच्या मातृभाषेची निष्ठा राखून ठेवत असत. मात्र पहिल्या महायुद्धाच्या वेळेस परकीय भाषा बोलणाऱ्या लोकांबद्दल बाकीच्यांना संशय वाटायला लागला होता. कदाचित ही माणसे जर्मनीचे छुपे पुरस्कर्ते आहेत, अशी भावना होती. आयोवा नावाच्या राज्यामध्ये रस्त्यावर परकीय भाषा बोलण्याची बंदी घालण्यात आली. इतर ठिकाणी इथपर्यंत मजल गेली नसली तरी आपण १०० टक्के अमेरिकन आहोत, असे दाखवण्याचा दबाव स्थलांतरित लोकांवर असायचा. हळूहळू त्या लोकांच्या संस्था, चर्च वगैरे मातृभाषेचा वापर सोडून इंग्रजीमध्ये सर्व व्यवहार करायला लागले.

तरीपण मला अजून आठवते की, १९४५च्या आसपास म्हणजे दुसरे महायुद्ध संपल्यानंतर आमचे शेजारी अजून Croatian भाषा वापरत असत व जवळपासच्या Croatian Hallमध्ये लग्नानंतरचा सोहळा आणि डान्स आयोजित करीत असत. आमची भाषा Croatian नसली तरी आम्हां मुलांना ते सर्व पाहायला मिळणे ही एक पर्वणीच होती.

**स्थलांतरित लोकांमध्ये मातृभाषेचा लोप**

असे अनुभव मात्र हळूहळू कमी होत गेले व एकूण स्थलांतरित लोकांच्या मातृभाषांचा लोप होत गेला. त्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे भिन्नभाषिक लोकांशी लग्न. आमच्या कुटुंबाचे उदाहरण पाहा. माझ्या वडिलांची मातृभाषा नॉर्विजन, आईची मातृभाषा फिनिश. एकमेकांची भाषा येत नसल्यामुळे ते इंग्रजीमध्येच बोलत असत व आमच्या कुटुंबात इंग्रजी ही एकमेव भाषा होती. आईकडून काही फिनिश गाणी आणि वडिलांकडून काही नॉर्विजन गाणी एवढीच भाषिक शिदोरी भूतकाळातून मिळाली. ही शिदोरी मला फार मोलाची वाटत होती. मात्र ती किती तुटपुंजी आहे, हे कालांतराने समजले. मी प्रथम नॉर्वेला गेले तेव्हा वडिलांकडून शिकलेले एक गाणे मी चुलत भावाला म्हणून दाखवले होते. तो फारसा प्रभावित झाला नव्हता. 'हे गाणे फार जुने आहे' एवढेच त्याने म्हटले.

त्याचप्रमाणे नुकतीच मुंबईमध्ये मला एक फिनिश बाई भेटली. मी तिला म्हटले की मी आईकडून एक फिनिश गाणे शिकले होते. ''कोणते गाणे?'' तिने विचारले, तर ''मिनं वान टिस्कान - एक मोलकरणीचे गाणे,'' असे मी सांगितले. ''हो'' तिने म्हटले. ''तेच गाणे अमेरिकेत गेलेल्या सगळ्या फिनिश लोकांना येते'' म्हणजे मी कौतुकाने जपून ठेवलेली सांस्कृतिक शिदोरी किती तुटपुंजी आहे हे पुन्हा कळून चुकले.

आमचे कुटुंब तर युरोपमधून आलेल्या पहिल्या किंवा दुसऱ्या पिढीचे आहे. मात्र तीन-चार पिढ्यांनंतर बहुधा इतक्या भिन्न भिन्न भाषिक लोकांची लग्ने झालेली असतात की आपल्या पूर्वजांच्या भाषा कोणत्या होत्या हा संशोधनाचा विषय ठरतो. यामुळे अमेरिका एकभाषिक राष्ट्र झाले आहे. (अलीकडे स्पॅनिश भाषिक लोकांचे प्रमाण बरेच वाढले म्हणून सध्या स्थिती बदललेली आहे; पण तो स्वतंत्र विषय असल्यामुळे त्याची चर्चा मी इथे करीत नाही.)

आतापर्यंत मी जे सांगितले ते एक प्रकारे आत्मकथन आहे. ते एवढ्या विस्ताराने सांगण्याची दोन कारणे आहेत. एकतर त्यातून बहुभाषिकतेबाबत भारतातील स्थिती व अमेरिकेतील स्थिती किती निराळी आहे हे दाखविण्यासाठी माझा स्वत:चा अनुभव सांगणे सोयीचे होते. शिवाय मला तुमच्यासमोर जो विचार मांडायचा आहे तो परिपूर्ण तयार झालेला नाही आहे. मला माहीत असलेल्या काही गोष्टी, वाचलेले काही विचार व स्वत:चे अनुभव एकत्रित करून मी एक अपूर्ण शोधाचे वर्णन तुमच्यासमोर मांडू पाहत आहे. हे ऐकत असताना कदाचित तुम्हांला जरा विस्कळीत वाटत असेल. शेवटी मी सगळे एकत्र बांधण्याचा प्रयत्न करीन.

तुम्ही सर्वजण हैदराबाद शहरातील बहुभाषिक परंपरेचे वारस आहात. म्हणजे या विषयाबाबत तुमचा अनुभव माझ्यापेक्षा कितीतरी जास्त समृद्ध आहे. माझी एवढी आशा आहे की माझ्या भाषणाच्या निमित्ताने तुमच्या अनुभवावर आणि तुम्हांला माहीत असलेल्या गोष्टीवर थोडाफार नवा प्रकाश पडेल.

**अलीकडे या विषयाकडे जास्त लक्ष**

अनेक वर्षांपासून बहुभाषिकता मला कुतूहलाचा विषय वाटत होता. पण गेल्या ५-६ वर्षांत या विषयाकडे माझे लक्ष जास्त प्रकर्षाने वेधण्यात आले आहे. त्याची मुख्यत: तीन कारणे आहेत.

पहिली गोष्ट म्हणजे NCERTचा राष्ट्रीय अभ्यासक्रम (NCF - National Curriculum Framework) करण्याची प्रक्रिया. त्या एका अपूर्व वैचारिक मंथन व प्रक्रियेमध्ये माझा लहानसा वाटा होता. तयार झालेल्या Documentमध्ये भाषेसंबंधीचा जो भाग आहे त्यात भारताच्या बहुभाषिकेबद्दल महत्त्वाचे विश्लेषण आहे. यात असे म्हटले आहे की, भारतातल्या बहुभाषिकतेमुळे अनेक आव्हाने आपल्यासमोर येतात; पण त्याबरोबर अनेक संधीही उपलब्ध झालेल्या आहेत.

या NCF Document कडे आपण नंतर परत वळू या. पण आधी Tata Institute of Social Sciencesमध्ये M. A. Educationच्या प्रोग्रॅममध्ये मला

मिळालेल्या अनुभवाबद्दल बोलायचे आहे. हा प्रोग्रॅम दोन वर्षांचा असून dual modeमध्ये चालतो. त्याचा अर्थ असा आहे की प्रत्येक सत्रामध्ये तीन आठवडे विद्यार्थी आणि प्रोफेसर एकत्र येतात. मग बाकी पंधरा आठवडे Internetच्या साहाय्याने विद्यार्थी स्वयंअध्ययन करतात.

या प्रोग्रॅममध्ये माझी मैत्रीण जेन साही आणि मी मातृभाषेचे अध्यापन - हा Course शिकवतो. आमचे विद्यार्थी भारतातल्या वेगवेगळ्या भागांतून येतात आणि वेगवेगळ्या शाळा व संस्थांमध्ये काम करतात. त्यांच्या समृद्ध अनुभवामुळे आमचा दृष्टिकोनही जास्त व्यापक झाला.

पहिल्या वर्षी दोन विद्यार्थी नर्मदा बचाव आंदोलनाचे कार्यकर्ते होते. त्यांच्याकडून नर्मदा खोऱ्यातील गुंतागुंतीच्या भाषिक परिस्थितीबद्दल बरीच माहिती मिळाली. त्या भागामध्ये अनेक लोक आदिवासी आहेत. मुख्यत: पावरा आणि भिल्ल जमातीचे. स्थानिक भाषा विशेषत: शेतकऱ्यांची व व्यापाऱ्यांची म्हणजे अहिराणी. मध्य प्रदेश जवळ असल्यामुळे काही लोक हिंदी बोलतात. मात्र, महाराष्ट्राचा भाग असल्यामुळे शाळेमध्ये मराठी भाषा हे शिक्षणाचे माध्यम. शाळेत आलेल्या आदिवासी मुलांना मराठी अजिबात येत नाही आणि शाळेच्या बाहेर मराठी त्यांच्या कानावर पडत नाही. शिवाय शिक्षकांना आदिवासी भाषा येत नाही व काही वेळेस त्यांना प्रमाण-मराठीही येत नाही. थोडक्यात आमच्या विद्यार्थ्यांकडून प्रथमच आदिवासी मुलांची व एकूण आदिवासी समाजाच्या भाषिक प्रश्नांची ओळख झाली.

प्रत्यक्ष आमच्या विद्यार्थ्यांमध्ये आणखी एक समस्या दिसली. ती म्हणजे काही विद्यार्थ्यांचे इंग्रजीवर पुरेसे प्रभुत्व नसते. त्यांना इंग्रजीमध्ये संभाषण करता येते पण व्याख्यान समजणे, पुस्तकातले उतारे वाचून त्यावर विचार करून लिहिणे या गोष्टी त्यांना कठीण जातात. M. A. Programmeतर्फे अशा विद्यार्थ्यांना शक्य तितकी मदत दिली जाते. पण विशेषत: घरी गेल्यावर स्वयंअध्ययन करणे हे त्यांना अवघड जाते. दुर्दैवाने अशा विद्यार्थ्यांचा जीवनानुभव समृद्ध असतो. मात्र तो अनुभव इतरांपर्यंत ते अनेक वेळा पोचवू शकत नाहीत.

दुसऱ्या टोकाचेही काही विद्यार्थी असतात. त्यांना अस्खलित इंग्रजी येते, पण कोणतीही भारतीय भाषा चांगल्या तऱ्हेने येत नाही. त्यामुळे ते या देशाच्या आम जनतेपासून फार दूर असतात. या मातीची मुळे तुटलेली असतात व पाश्चात्त्य संस्कृतीही पूर्णपणे आत्मसात झालेली नसते. त्यामुळे ही मुले त्रिशंकूसारखी असतात. ही संदिग्ध परिस्थिती काही विद्यार्थ्यांना फार त्रासदायक वाटते.




अनुक्रमणिका

आणखी एक समस्या पूर्णपणे अनपेक्षित होती. ती म्हणजे काही विद्यार्थ्यांनी सांगितले की, त्यांच्यावर मातृभाषा सोडण्याचा दबाव येतो. एक शीख विद्यार्थिनीचा अनुभव विशेष उद्बोधक आहे. तिची मातृभाषा पंजाबी, ती लहानपणी घरी पंजाबी बोलायची आणि काही वर्षे ती पंजाबी माध्यमाच्या शाळेत शिकली. नंतर ती इंग्रजी माध्यमाच्या शाळेत गेली. ती १४-१५ वर्षांची असताना तिच्या भावाने तिला बजावून सांगितले की, ''तू माझ्याशी पंजाबीत बोलू नकोस. हिंदीत बोल किंवा इंग्रजीत बोल. तू पंजाबीत बोललीस तर माझे मित्र मला हसतील. आपले कुटुंब गावंढळ आहे म्हणून!''

**भाषांची उतरंड**

आमच्या विद्यार्थ्यांच्या भाषाविषयक अनुभवांची जी झलक मी तुम्हाला दाखविली तीत काही गोष्टी प्रकर्षाने दिसून येतात. पहिली गोष्ट म्हणजे आपल्याकडे जशी सामाजिक उतरंड दिसते तशी भाषांच्या बाबतीतही दिसते. या उतरंडीमध्ये सगळ्यात खाली म्हणजे आदिवासी भाषा. त्यांच्यावर वेगवेगळ्या राज्यभाषा. उत्तरेकडे त्यावर हिंदी भाषा व सगळीकडे एकदम वर म्हणजे इंग्रजी. जसजसे आपण वर जातो तसतसे त्या भाषेला जास्त प्रतिष्ठा असते. आदिवासी भाषेला सगळ्यात कमी प्रतिष्ठा, मग राज्यभाषा, त्यावर हिंदी व सर्वांत वर इंग्रजी.

या उतरंडीला आर्थिक बाजूही असते. जसजसे माणूस वर जातो तसतसे नोकरी मिळण्याची शक्यता वाढते. एकूण राहणीमान सुधारण्याची शक्यता असते. सत्तेमध्येही सहभाग मिळू शकतो. मात्र वर जाण्यासाठी काही वेळेस माणसाला जबरदस्त किंमत मोजावी लागते. ती म्हणजे आपल्या मातृभाषेचा कमी-अधिक प्रमाणात त्याग करणे.

आदिवासींची परिस्थिती परत बघू या. बहुसंख्य आदिवासी लोकांना वाटते की आपल्या मुलांनी शाळेत जावे. पण शाळेमध्ये मुलांनी कुठली भाषा शिकावी- आदिवासी भाषा की राज्यभाषा? माझ्यासारखे शिक्षणतज्ज्ञ ठामपणे म्हणतात की, ''तुमच्या मुलांना अगोदर मातृभाषेतून शिकू द्या आणि नंतर त्याला प्रांतीय भाषेकडे जाऊ द्या.'' मात्र, पुष्कळदा आदिवासी पालकांना हे पटत नाही. त्यांना दिसते की प्रांतीय भाषा बोलणाऱ्यांना नोकरी मिळते, प्रांतीय भाषिकांच्याकडे सत्ता असते व तीच भाषा मुलांनी शिकावी अशी त्यांची इच्छा असते.

दुर्दैवाची गोष्ट अशी आहे की, आदिवासी मुले शाळेत गेल्यावर पहिली ३-४ वर्षे प्रांतीय भाषा शिकण्यात जातात आणि ती मुले कायमची अभ्यासात मागे राहतात. शिवाय अनेक वेळा त्यांची हेटाळणी होते. मागच्या वर्षी मी

कर्नाटकातील चामराजनगर जिल्ह्यातल्या सोलिगा जमातीच्या मुलांच्या आश्रमशाळेबद्दल फिल्म पाहिली. ती फिल्म छोटी आहे; पण विदारक. तिचे नाव 'Which Language? Whose Language?' (कोणती भाषा? कोणाची भाषा?) पहिल्या sceneमध्ये शाळेची प्रार्थना चालू आहे. मुले म्हणतात, ''कन्नड माता चिरायू असो। कन्नड माझ्या रक्तवाहिन्यांमध्ये वाहते'' वगैरे वगैरे. दुसरा scene वर्गात आहे. शिक्षक मुलांना म्हणतात, ''मी कन्नडिगा आहे. माझी भाषा कन्नड. तुम्ही सोलिगा, तुमची भाषा काय आहे? सोलिगा एक भाषा आहे का? ती फक्त कन्नड, तेलगू व तामिळचे मिश्रण आहे! तुमच्या भाषेला लिपी आहे का?'' एक मुलगा पाटीवर काहीतरी लिहितो, शिक्षक बघतात व म्हणतात, ''पण ते कन्नड आहे.'' असे ४-५ मिनिटांत ते त्या मुलाची भाषिक अस्मिता पूर्णपणे चिरडून टाकतात. फिल्म पाहत असताना आपल्याला आश्चर्य वाटते की कॅमेऱ्यासमोर हा माणूस एवढ्या उघडपणे बोलतोय. पण बहुतेक आपण काहीतरी गैर बोलतोय याचीही त्याला जाणीव नाही.

थोडक्यात, मुलांनी प्रांतीय भाषा शिकावी म्हणून पालक मुलांना शाळेत पाठवतात. मात्र मुले पुष्कळदा नीट शिकत नाहीत. कृष्णकुमार यांच्या शब्दांत ती फक्त मागास बनायला शिकतात. मुले मातृभाषेचा संपूर्णपणे त्याग करीत नसतील, पण मातृभाषेत भाषिक कौशल्याचा विकास नक्कीच होत नसेल. शिवाय आदिवासी संस्कृती अभिमानास्पद आहे व त्यातून बाकीच्या समाजाला काहीतरी शिकण्यासारखे आहे असे कोणालाही वाटत नाही.

**इंग्रजीचे आकर्षण**

जो माणूस प्रांतीय भाषा बोलतो तो आदिवासींपेक्षा कदाचित संरक्षित असेल. मात्र, त्याचीही ओढाताण होत असते. इंग्रजी आल्याशिवाय आपल्या मुलांचे भवितव्य चांगले नाही असे बहुसंख्य लोकांना वाटते. आपण नाही तर आपल्या मुलांनी इंग्रजी शिकावे, मग त्यांना नोकरी मिळेल. त्यांची राहणी सुधारेल. हे स्वप्न भारतभर सगळीकडे आढळते.

अर्थात या स्वप्नात बरेच तथ्य आहे. उच्च शिक्षण, उच्च नोकरी - राष्ट्रीय वा आंतरराष्ट्रीय पातळीवर हवी असेल तर आजकाल इंग्रजी आवश्यक आहे. जसे एके काळी हैदराबादमध्ये उच्च नोकरीसाठी उर्दूची गरज होती.

ज्याला शक्य असेल तो माणूस आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेमध्ये पाठवतो. शाळा चांगली असेल तर मुले इंग्रजी शिकतील, चांगली नसेल तर ती फारसे शिकणार नाहीत. पण दोन्ही प्रकारच्या शाळांमध्ये एक प्रकारची

सांस्कृतिक आत्महत्या होते. मुले आपल्या मातृभाषेपासून दूर होतात व पाश्चात्त्य संस्कृतीही आत्मसात करू शकत नाहीत.

जी माणसे आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेत पाठवू शकत नाहीत त्यांची अपेक्षा असते की प्रांतीय भाषेच्या शाळेमध्ये मुलांनी उत्तम इंग्रजी शिकावी. सध्या मात्र सरकारी शाळा असे करण्यास असमर्थ असतात. शिक्षणाधिकाऱ्यांना व राज्यकर्त्यांना चांगली जाणीव असते की आपण त्यांच्या आकांक्षांची पूर्तता करू शकत नाही; पण ते तसे कबूल करत नाहीत. केले तर एखाद्या वेळेस सरकारी शाळा पूर्णपणे ओस पडतील. म्हणून ते 'पहिलीपासून इंग्रजी' सारखी धोरणे सुरू करतात. ते केवळ जनतेला खूष करण्यासाठी असते; हे यशस्वी होणार नाही, याची पूर्ण जाणीव असतेच.

या दृष्टिकोनातून मुलायमसिंग यादव यांनी परवा इंग्रजीबद्दल केलेली वक्तव्ये समजण्यासारखी आहेत. पूर्वीपासून उत्तर भारतात - ज्याला हिंदी बेल्ट म्हणतात - उत्तम इंग्रजी येणाऱ्या माणसांचे प्रमाण दक्षिण किंवा पश्चिम भारतापेक्षा कमी आहे. म्हणून ''आम्ही तुमच्या मुलांना उत्तम इंग्रजी शिकवू'' असे म्हणण्याऐवजी, ''नोकरी व इंग्रजी यांची सांगड आम्ही तोडू'' असे आश्वासन मुलायमसिंग यांनी दिले होते. अर्थात या विधानावर जोरदार टीका झाली. शिवाय उत्तर प्रदेशच्या सरकारने काही केले तरी इंग्रजीचे महत्त्व, वर्चस्व म्हणा राहणारच.

भाषांच्या उतरंडीबद्दलचे जे चित्र मी आता तुमच्यासमोर मांडले ते अर्थात फार ओबडधोबडपणे रेखाटलेले आहे. वस्तुस्थिती यापेक्षा खूपच जास्त गुंतागुंतीची आहे. मात्र सद्य:स्थितीचे एक महत्त्वाचे सत्य दिसून येते ते म्हणजे आपल्याकडील समाज बहुभाषिक असला तरी आणि अनेक माणसे व्यवहारापुरतीच २-३ भाषा वापरू शकत असली, तरी माणसे भाषेकडे आपल्या आर्थिक व सामाजिक उन्नतीचे साधन म्हणून बघतात. अमकी भाषा शिकलो तर उच्च शिक्षण घेता येईल, चांगली नोकरी मिळेल व एकूण सामाजिक प्रतिष्ठा मिळेल, असे त्यांना वाटते.

आर्थिक आणि सामाजिक उन्नती मिळविण्याचे साधन म्हणून भाषेकडे बघणे यात काही गैर नाही, असे काहींचे म्हणणे आहे. पॉल ब्रास नावाच्या अमेरिकन प्रोफेसरांनी भारतातील भाषा-व्यवहाराचा अभ्यास केला असून त्यांच्या मते हाच दृष्टिकोन योग्य आहे. आपली राहणी सुधारण्यासाठी, सामाजिक प्रतिष्ठा मिळविण्यासाठी मातृभाषेचा त्याग करायला काही हरकत नाही, असे पॉल ब्रास प्रतिपादन करतात. ते आठवण करून देतात की खुद्द रवींद्रनाथ टागोर यांनी इशारा दिला होता की मातृभाषेचे पूजन करता कामा नये.

ब्रास यांचे म्हणणे पूर्णपणे चुकीचे आहे असे म्हणता येणार नाही. त्यांच्या म्हणण्यामध्ये बरेच तथ्य आहे. विशेषतः त्यांचा मातृभाषेला देवी न बनविण्याचा इशारा. तरीपण त्यांचा दृष्टिकोन फारच एकांगी वाटतो. मला स्वतःला मर्ढेकरांच्या काव्याबद्दल यत्किंचितही माहिती नाही, पण काल डॉ० नागनाथ कोत्तापल्ले यांनी सांगितले की समाज मूल्यहीन झाला आहे, माणूस केवळ पैशाच्या मागे लागला असून, संस्कृतीचा ऱ्हास झाला आहे, असे मर्ढेकरांचे म्हणणे होते.

शेवटी या प्रश्नाबाबत आपण काय भूमिका घ्यावी? माझ्या मते विचारवंतांसाठी मातृभाषा व प्रतिष्ठेची भाषा - सध्याच्या बाबतीत इंग्रजी म्हणा - या दोन्हींमध्ये एक रास्त tension आहे. मातृभाषेच्या द्वारे माणूस अनेक शतकांच्या इतिहासाला जोडलेला असतो. जीवनाला एक संस्कृतीची चौकट मिळालेली असते. अर्थात यातला धोकाही ओळखायला हवा. कुठल्याही समाजाच्या इतिहासामध्ये अन्याय भरपूर आहे. कुठल्याही संस्कृतीमध्ये अनेक गोष्टी त्याज्य असतात. भारताबद्दल बोलायचे झाले तर जातिव्यवस्था, स्त्री-पुरुष असमानता, सरंजामशाही मनोवृत्ती या गोष्टी त्याज्य आहेत, असे लगेच मनात येते.

मात्र, ज्या व्यक्तीचे नाते मातृभाषेशी शाबूत असते आणि जी व्यवहाराने व वाचनाने तळागाळातील माणसांपर्यंत पोचू शकते त्या व्यक्तीला समाजसुधारणेचे काम करता येते. या भाषणाच्या सुरुवातीला मी सांगितले होते की, टाटा इन्स्टिट्यूटच्या MA in Education प्रोग्रॅममध्ये कोणतीही भारतीय भाषा येत नसलेले काही विद्यार्थी असतात. यांतली एक मुंबईमध्ये राहणारी बाई आहे. ती बरीच हुशार, अत्यंत संवेदनशील. मात्र, भारताच्या समाजजीवनाबद्दल तिचे कमालीचे अज्ञान. ''मी MA in Education प्रोग्रॅम जॉईन करेपर्यंत माझी समजूत होती की भारतामध्ये जातिव्यवस्था केव्हाच नष्ट झालेली आहे'', असे ती म्हणाली. म्हणजे तिला या देशाचा ना भूतकाळ समजत, ना वर्तमानकाळ. भविष्याबद्दल तर प्रश्नच नाही.

एवढे असूनही हे मात्र आवर्जून सांगायला पाहिजे की, प्रामाणिक विचारवंत केवळ स्वतःच्या मातृभाषेच्या चौकटीत राहिला तर त्याला गुदमरल्यासारखे वाटेल. टागोरांनी म्हटल्याप्रमाणे त्याला इतर संस्कृतींचे वारे आवश्यक असतात.

सोळाव्या-सतराव्या शतकांमध्ये इस्लाम धर्म भारतात आल्यामुळे आध्यात्मिक विचाराला चालना मिळाली होती. संत एकनाथ यांच्या 'हिंदू-तुर्कवाद' या काव्यामध्ये हे दिसून येते. परवा डॉ० विद्या देवधर मला त्यांच्या दख्खन (डेक्कन)मधील सामाजिक इतिहासाबद्दलच्या संशोधनाच्या बाबतीत

सांगत होत्या की, हिंदू-मुस्लिम धर्मीयांच्या संवादामुळे आध्यात्मिक दृष्टिकोन कसे विशाल आणि सहिष्णू बनले. हे ऐकून मी फार प्रभावित झाले. त्यातील एक वाक्य बाईंनी मला लिहून दिले ते असे - 'तुबदीखान व शहातुराब हे खरे बोलतात व देवावर श्रद्धा ठेवतात, त्यांना वैष्णव का म्हणू नये?' आजकाल हिंदू-मुस्लिमांमध्ये वैर मुद्दाम निर्माण करण्याचा प्रयत्न केला जात असताना अशा इतिहासाचा अभ्यास करणे फार गरजेचे आहे.

त्या वेळी फारसी, अरबी भाषा आणि इस्लाम यांची ओळख झाल्यामुळे भारतामध्ये वैचारिक मंथन सुरू झाले होते. नंतर ब्रिटिश आले इंग्रजी भाषा आणि पाश्चात्त्य संस्कृती घेऊन. एका अत्यंत महत्त्वाच्या लेखामध्ये इतिहासकार रामचंद्र गुहा यांनी सांगितले की, १९२०-१९८० या काळातील भारतात एक अभूतपूर्व वैचारिक मंथन सुरू झाले होते. सुरुवातीला गांधीजींच्या नेतृत्वाखाली स्वातंत्र्याच्या चळवळीमध्ये मुलभूत प्रश्नांचा जोरदार विचार करण्यात येत होता. स्वतंत्र भारताने विकासाचा कोणता मार्ग स्वीकारावा - सोविएट रशियाची हुकूमशाही अथवा पाश्चात्त्य देशांची लोकशाही? पाश्चात्त्य देशांप्रमाणे औद्योगिकीकरण करावे की ग्रामीण विकास करावा? धर्मनिरपेक्ष राष्ट्र असावे का? असमानता नष्ट करून स्त्री पददलित व आदिवासींना न्याय कसा देता येईल?

गुहा यांचे पुढील विधान अतिशय महत्त्वाचे आहे. '१९२० ते १९८० या दरम्यान बंगाली आणि मराठी या जगातील दोनच द्विभाषिक संस्कृती होत्या. फ्रेंच लोक फ्रेंचमध्येच लिहितात, विचार करतात व बोलतात; इंग्रज इंग्रजीमध्ये. मात्र पुणे आणि कलकत्त्याला वैचारिक वाङ्मयाचे लेखन आणि चर्चा इंग्रजीमध्ये व स्थानिक भाषेमध्ये असत. महाराष्ट्रातील इरावती कर्वे व बंगालमधील निर्मलकुमार बोस हे दोघे मानववंशशास्त्रज्ञ पूर्णपणे द्विभाषिक होते. गरजेप्रमाणे ते मातृभाषेत नाहीतर, इंग्रजीमध्ये लिहू शकत होते.'

**आज काळाची गरज**

आजकाल परत या देशापुढे काही मूलभूत समस्या आहेत. त्यांतला एक प्रश्न जुनाच आहे. स्त्री, पददलित, आदिवासींना न्याय कसा द्यायचा? आता काही प्रश्न पूर्वीपेक्षाही ज्वलंत आहेत. वेगवेगळ्या धर्माचे लोक या देशात शांततेने, मैत्रीने, एकोप्याने कसे राहू शकतील? काही नवीन प्रश्नही आहेत. जागतिकीकरणाला कसे तोंड देता येईल? जागतिक तापमानवाढीला (Global Warming) कसे तोंड देता येईल? निसर्गाशी जवळीक साधून शाश्वत अर्थव्यवस्था व जीवनपद्धती कशी विकसित करता येईल? शैक्षणिक प्रश्नांचा मूलभूत विचार करण्यासाठी

विश्वव्यापी मानवी मानसशास्त्र व भारतीय समाजजीवनावर आधारित शिक्षणाचे समाजशास्त्र (Sociology of Education) विकसित करता येईल का?

या प्रश्नांच्या उत्तरांचा शोध घेण्यासाठी भक्कम बहुभाषिक पाठबळ लागेल. केवळ विशिष्ट प्रांतामध्ये जन्म झाल्याने ३-४ भाषा बोलता येणे हे पुरेसे नाही. मुद्दाम विचारवंतांचा धर्म मानून, समाजाची गरज म्हणून बहुभाषिक चौफेर कौशल्ये - श्रवण, भाषण, वाचन, लेखन - संपादन करून वैचारिक देवाणघेवाणीसाठी वापरणे ही काळाची गरज आहे. केवळ मातृभाषा आणि इंग्रजीच नाही, तर इतर प्रांतीय भाषा आणि आदिवासी भाषा शिकणे गरजेचे आहे. व्यक्तीने तीन भाषांवर प्रभुत्व संपादन केले तर उत्तम, नाहीतर विचारवंतांचे बहुभाषिक जाळेही (Network) तयार करता येईल.

हे स्वप्न आहे - Vision - पण ते वस्तुनिष्ठ आहे. 'पंचधारा' हे त्रैमासिक पाच भाषांना वाहिलेले आहे. (मराठी, तेलगू, हिंदी-उर्दू, कन्नड, तमीळ). डॉ० देवधर आणि त्यांचे सहकारी भारतातल्या वेगवेगळ्या भाषांमधल्या स्त्री-लेखकांचा अभ्यास करीत आहेत. असे प्रयत्न जाणूनबुजून वाढवायला पाहिजेत.

या प्रयत्नांमध्ये केंद्रीय सरकार, राज्य सरकारे व विद्यापीठे यांनी हातभार लावला पाहिजे. कदाचित काही ठिकाणी वेगवेगळ्या भाषिक विभागांऐवजी भारतीय तुलनात्मक वाङ्मयाचे विभाग स्थापन करायला हवेत.

हे सर्व प्रयत्न करीत असताना आपण लक्षात ठेवायला पाहिजे की, भाषा-व्यवहार, भाषा-शिक्षण, इतिहास, समाजशास्त्र हे केवळ विद्वानांचे खेळ नव्हेत. ती समाजाच्या मूलभूत प्रश्नांचा शोध घेण्यासाठी साधने आहेत. भाषा एक साधन आहे. तिचा वापर सत्ता गाजविण्यासाठी करता येईल, नाहीतर माणसांना जोडण्यासाठीही करता येईल. बहुभाषिक भारताचे हे स्वप्न - ही Vision - मी आपल्यासमोर मांडली आहे. आपल्यासारख्या सुशिक्षित, सुसंस्कृत समाजघटकांच्या विचारांना याने चालना मिळेल अशी मी आशा करते.

(प्रा० रा०ब० माढेकर यांच्या जन्मशताब्दी सोहळ्यात हैदराबाद येथे केलेले भाषण. 'पंचधारा' एप्रिल-सप्टेंबर २००९ अंकावरून)

■

टपालपेटी क्र० 63, फलटण 415 523
दूरभाष : (02166)22 0586

# रुचेची ना, पटेची ना!

प्र०ना० परांजपे

१) सामान्य रूपांची ऐशी तैशी!

क्रियापदाला लिंग कशाला?

**मोहन जोशी नाट्यसंमेलनाध्यक्ष**

अमेरिकेतील फिलाडेल्फिया येथे होणारे पहिले विश्व नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपद मोहन जोशी यांनी स्वीकारावा, असा निर्णय नाट्यपरिषदेच्या नियामक मंडळाने घेतला आहे.

.... पान ४

दै०सकाळ, पृ०१, दि०१८ मे २०१०

२) शब्दाची मोडतोड केली तरी अर्थ कळतो ना?

**व्यंध्यत्वावरील उपचारांमुळे प्रसूतीच्या प्रमाणात वाढ**

दै०लोकसत्ता, दि०१८ मे २०१०

हे खरे हिंदीप्रेम!

पाहतील. डीएमआरसीने बनवलेला सध्याचा डीपीआर या सर्व कसोट्यांवर खरा उतरेल असा योग्यतेचा मुळीच वाटत नाही. पुढे जाऊन डीपीआर अपूर्ण / कुचकामी आहे या कारणाखातर प्रकल्प मागे येण्यापेक्षा आताच सर्व त्रूटी दूर करणे योग्य ठरेल. सर्व विरोध दडपून प्रकल्प पुढे सरकवलाच तरी सार्वजनिक हित याचिका दाखल होईलच. तेव्हा उच्च न्यायालयासमोर काय सांगणार? हेच की कोणत्याही चर्चा न होऊ देता आम्ही प्रकल्प मंजूर केला? ■

दै०लोकसत्ता, दि०२२ मे २०१०

इंग्रजीने केला मराठी भ्रतार!

**नळजोडांच्या सर्व्हेक्षणासाठी तब्बल ५० लाख**

पिंपरी, २१ मे / प्रतिनिधी

पिंपरी-चिंचवड शहरात जलवाहिन्यांवरील नळजोडांचे खासगी संस्थेच्या माध्यमातून सर्व्हेक्षण करण्यात येणार असून त्यासाठी तब्बल ५० लाख रुपये खर्च करण्यात येणार आहेत. विधी समितीच्या बैठकीत या सर्व्हेक्षणासाठी होणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली.

दै० लोकसत्ता, (पुणे वृत्तान्त) पृ०३, दि०२२ मे २०१०



अनुक्रमणिका

# संगणकव्यवहाराचे मराठीकरण

सुशान्त शंकर देवळेकर

**संगणकव्यवहार आणि स्थानिकीकरण**

जागतिकीकरणाच्या प्रक्रियेबरोबरच उत्पादनांच्या स्थानिकीकरणाची संकल्पनाही महत्त्वाची ठरते. किंबहुना ह्या दोन्ही प्रक्रिया एकमेकींशी नाते राखणाऱ्या आहेत. जागतिकीकरणाच्या प्रक्रियेत जगातील एका टोकाला असलेली वस्तू जगाच्या दुसऱ्या टोकाला सहज उपलब्ध होऊ लागली आहे. पण त्याबरोबरच जगाच्या त्या टोकाला ती वस्तू पुरवताना तिथल्या स्थानिक आवश्यकता काय आहेत हेही ध्यानात घेण्याची आवश्यकता आहे ह्याचे भान आता येऊ लागले आहे. संगणकक्षेत्रातही ह्या स्थानिकीकरणाला विशेष महत्त्व लाभले आहे.

**मराठीकरणाची उद्दिष्टे**

ज्या विशिष्ट सामाजिक-राजकीय परिस्थितीत आपण वावरत आहोत तिचे भान न ठेवता जर आपण संगणकव्यवहाराचे मराठीकरण करू गेलो तर ते निव्वळ उपचार म्हणून केलेले काम ठरेल. आपले मराठीकरण हे असे असू नये. ह्यासाठी मराठीकरणाच्या उद्दिष्टांतले विविध घटक लक्षात घेणे आवश्यक आणि हितकारक आहे. आपल्याला केवळ शब्दान्तर करायचे नाही. उपचारापुरते शब्दाला शब्द उभे करायचे नाहीत. संगणकाविषयी मराठीतून नेमकेपणे बोलता येईल ह्यासाठी पूर्वसिद्धता करायची आहे. मराठीकरणामागचे हेतू कोणते हे पाहू गेल्यास पुढील उद्दिष्टे ध्यानात येतात.

**(अ) अस्मितेचा आविष्कार :** मराठी ही माझी स्वभाषा आहे आणि मला माझा ज्ञानाविष्कार मराठीतूनच करायचा आहे अशी भूमिका घेणारे काही लोक असतात. भाषा हा त्यांच्या अस्मितेचा भाग असतो. मला माझ्या भाषेतून हे करता येते हे त्यांना जगाला दाखवून द्यायचे असते. (अशा तऱ्हेची) भाषिक अस्मिता हा फार महत्त्वाचा मुद्दा ठरतो. जपान, चीन, स्पेन, फ्रान्स अशा देशांत आपल्या स्वभाषेतच आपला ज्ञानव्यवहार आणि इतर सर्व व्यवहार करू इच्छिणारा फार मोठा वर्ग अस्तित्वात आहे. खरे तर जगात विविध ठिकाणी असलेल्या अशा वर्गाच्या अस्तित्वामुळेही जागतिक संगणकव्यवहाराच्या स्थानिकीकरणात भाषा ह्या घटकाला महत्त्व लाभते आहे.

**(आ) भाषासमृद्धी :** जीवनव्यवहाराच्या विविध क्षेत्रांत वापरी जाणारी भाषा त्या त्या व्यवहारासोबत आपोआप समृद्ध होत असते. आपली भाषा ही ह्या





अनुक्रमणिका

संगणकीय व्यवहारक्षेत्राची (आणि अशाच इतर अनेक व्यवहारक्षेत्रांची) स्वाभाविक भाषा असती तर आपल्याला हा सगळा स्थानिकीकरणाचा खटाटोप करावाच लागला नसता. पण दुर्दैवाने तशी परिस्थिती नाही. अशा वेळी आपल्याला एक तर हा व्यवहार आपल्या भाषेत करताच येणार नाही असे म्हणून गप्प बसावे किंवा आपल्या भाषेची क्षमता ओळखून ती भाषा अशा व्यवहाराला तयार होईल असे प्रयत्न करावेत. असे प्रयत्न नेटाने झाल्यास भारतीय भाषांना लाभलेली वाङ्मयाची परंपरा अधिक समृद्ध होऊ लागेल. आपल्या भाषेचा लवचीकपणा, शब्दसिद्धीची प्रक्रिया ह्या सर्वांची जाण ह्या उद्दिष्टात महत्त्वाची ठरते.

(इ) **आकलनसुलभता :** अजूनही आपल्याकडचा फार मोठा समाज आपला ज्ञानव्यवहार आणि सामाजिक व्यवहार मराठीत करत असतो. (हे संख्याबळ किती काळ टिकेल हा प्रश्न आता सहज दुर्लक्षिता येणार नाही.) अशा समाजाला संगणकीय व्यवहार सहज कळावा हे आपले एक उद्दिष्ट असणार आहे. अनेकांना आकलनसुलभता हा मुद्दा ह्या उद्दिष्टांच्या क्रमात शेवटी घातलेला पाहून आश्चर्य वाटले असेल. पण आपण ज्या सामाजिक-राजकीय परिस्थितीत जगत आहोत तिच्यात हा मुद्दा पहिला मुद्दा होऊ शकत नाही. इंग्रजीत चाललेला ज्ञानव्यवहार कळत नाही ह्यावर आपण इंग्रजीतूनच शिकणे आणि आपण इंग्रजीतच ज्ञानव्यवहार करत राहणे हा एक मार्ग आहे. बहुसंख्य अभिजनांनी स्वातंत्र्यपूर्व काळापासूनच हा मार्ग अवलंबलेला आहे आणि आपल्याकडचा बहुजनसमाजही आता त्या मार्गाकडे वेगाने वाटचाल करतो आहे. शासनाचा आणि लोकप्रतिनिधींचा ह्या मार्गालाच पाठिंबा आहे. तेव्हा निव्वळ आकलनाचा मुद्दा हा मर्यादित ठरतो. केवळ ह्या मुद्याला महत्त्व द्यायचे असेल तर मराठीत हा व्यवहार आणण्याच्या खटाटोपापेक्षा मराठीला सोडून देऊन इंग्रजीशरण होण्याचा मार्ग हा कमी कष्टाचा आहे असेही अनेकांना वाटते.

पण मराठीकरणाच्या दृष्टीने आपण हा मुद्दा लक्षात घ्यायला हवा. त्यामुळे केवळ उपचार म्हणून भाषान्तर करण्याच्या प्रवृत्तीला काही आळा बसण्याची शक्यता निर्माण होते. आपण केलेले मराठीकरण हे लोकांना हा विषय कळावा ह्यासाठी आहे ह्याची जाण असणे आवश्यक आहे.

### संगणकव्यवहार आणि मानवी भाषा

संगणकव्यवहारात एखाद्या मानवी भाषेचा वापर आपण दोन प्रकारे करतो. एक म्हणजे वापरकर्त्यांच्या सोयीसाठी संगणकीय यंत्रणेचा भाग म्हणून

संवादपटलावर आपण मानवी भाषा वापरतो. ह्यात व्यक्ती जेव्हा संगणक वापरते तेव्हा संगणक़ाच्या पडद्यावर तिला विविध सूचना दिसतात. त्यातून कोणत्या क्रियेनंतर त्या वापरकरी व्यक्तीने काय करणे अभिप्रेत आहे ह्याचे मार्गदर्शन मिळते. दुसऱ्या प्रकारात वापरकरी व्यक्ती आपल्या भाषेतील माहिती संगणकावर नोंदवते, साठवते, हवी तेव्हा त्यातील माहिती हुडकून वापरू इच्छिते, तिची देवाणघेवाण करू इच्छिते. आपण ह्यांपैकी पहिल्या प्रकारच्या भाषिक व्यवहाराचा विचार करत आहोत.

### घडवलेल्या संज्ञा आणि स्वीकारलेल्या संज्ञा

जो ज्ञानव्यवहार आपल्याकडचा नाही, जो आपण कुणा इतरांकडून शिकलो आहोत, त्या व्यवहारासाठी संज्ञाही त्याच भाषेतून घ्यायला काय हरकत आहे असे एक मत आहे. नाहीतरी विविध भाषा बोलणारे लोक एकमेकांच्या संपर्कात आले म्हणजे त्यांच्या भाषांमध्ये परस्परांत देवघेव होतच असते. संगणकविज्ञान आणि संगणकतंत्रज्ञान आपण युरोप-अमेरिकेकडून घेतले तेव्हा त्यांनी वापरलेल्या संज्ञाच आपण का स्वीकारू नयेत? उगाच मराठी संज्ञा शोधत बसण्याची कटकट कशाला हवी! ही भूमिका काही नवी नाही. पण भाषाभाषांतील देवघेव ही जितकी स्वाभाविक आहे असे भासते वा भासवण्यात येते तशी ती खरोखर असतेच असे नाही हेही आपण ध्यानात घ्यायला हवे. त्यातली स्वाभाविकता आणि अगतिकता ह्या दोन्ही गोष्टी चिकित्सक बुद्धीने तपासायला हव्यात. ज्या दोन भाषांच्या संबंधांबाबत आपण बोलतो आहोत त्या भाषांचे राजकीय-सामाजिक बलाबल काय ह्याचे भान ठेवले नाही तर ह्या तथाकथित स्वाभाविक देवघेवीची परिणती ही एका भाषेने स्वाभाविकपणे दुसरा भाषा मटकावण्यात होते. हा विचार केल्यास सध्याच्या परिस्थितीत इंग्रजीतले शब्द मराठीत सरसकट घेणे टाळावे. अगदी निरुपाय असेल तरच घ्यावे. शक्यतो मराठी धाटणीचे नवे शब्द घडवावे असे प्रस्तुत लेखकाला वाटते. फाइल, फोल्डर, ड्राइव्ह ह्यांना धारिका, संचिका, खण हे किंवा अधिक चांगले इतर मराठी पर्याय वापरणे चांगले.

### पारिभाषिक संज्ञा

संज्ञांना भाषाव्यवहारात एक उद्दिष्ट असते ते म्हणजे वस्तुबोधाचे. संज्ञा आपण वापरतो त्या एखाद्या गोष्टीचा निर्देश व्हावा म्हणून. पारिभाषिक संज्ञा हा संज्ञांचा विभाग होतो तो विशिष्ट संदर्भाच्या सापेक्षतेने. इथे संज्ञांचा अर्थ हा मूलतः एका मर्यादित क्षेत्रातल्या व्यवहारानुसार ठरतो. पारिभाषिक संज्ञांचा वापर हा मुख्यत्वे त्या क्षेत्रातील जाणकार करत असतात. डॉ० अशोक केळकर ह्यांनी दिलेले

उदाहरण वापरायचे तर पाणी ही संज्ञा व्यवहारात आपण वापरतो ती पिण्याजोगा, धुण्यासाठी वापरायचा द्रवरूप पदार्थ अशा अर्थाने. पण रसायनविज्ञानात त्याच्या ह्या संदर्भापेक्षा त्याची घडण महत्त्वाची ठरते. पाणी हे हायड्रोजन आणि ऑक्सिजन ह्यांच्या अणूंचे संयुग आहे ह्याला तिथे प्राधान्य असते. मराठीकरणाचा विचार करताना संज्ञाव्यवहाराचे हे वैविध्य ध्यानात घ्यायला हवे.

**मराठीकरणाच्या प्रक्रियेविषयी**

सर्वसाधारणपणे संगणकप्रणाल्यांच्या देशीकरणात जी पद्धत वापरतात ती म्हणजे इंग्रजीतली संज्ञांची यादी देऊन त्यांना देशी भाषांत कोणते पर्याय आहेत ते लोकांना नोंदवायला सांगणे. पण ह्या पद्धतीत काही तोटे आहेत. ह्या पद्धतीत संज्ञाव्यवहार तुकड्यातुकड्यांत विखुरलेला असतो. त्याचे भान राहतेच असे नाही. संज्ञांचे एकमेकांशी असलेले संबंध, वापराचे संकेत ह्या सगळ्यांचे एकत्रित भान येतेच असे नाही.

संज्ञांचे पर्याय निवडण्यासाठी देताना स्रोतभाषेतील संज्ञा आणि तिच्यापुढे पारिभाषिक अर्थ अशी सामग्री आपल्यापुढे आपण ठेवली तर संदर्भांचा घोटाळा होणार नाही आणि मराठीकरणही चपखल होईल. त्यामुळे स्रोतभाषेतील संज्ञांचे व्यवहारातले अर्थ आपोआपच गळतील.

दुसरे म्हणजे सुट्या संज्ञा देण्यापेक्षा वाक्येच जर समोर असली तर अर्थाचे संदर्भ स्पष्ट होतात. ह्या दृष्टीने 'साहाय्य' ह्या विभागातील नोंदींचे मराठीकरण प्रथम करण्याचा प्रयत्न झाल्यास अधिक रेखीव संज्ञा उपलब्ध होऊ शकतील. आणि वापरकर्‍यांच्या दृष्टीने पाहता त्यांना फार निकडीची असणारी सोय ह्यातून आपोआप लाभले.

**नेमके अर्थसंदर्भ**

सर्वसामान्यपणे भाषेतील शब्दाशी विविध संदर्भ निगडित असू शकतात. अशा वेळी शब्दाचा नेमका संदर्भ नीट कळणे आणि तो नीट व्यक्त होणे हे आवश्यक आहे. अनेकदा शब्दाच्या पारिभाषिक अर्थापेक्षा व्यवहारातल्या सामान्य अर्थाच्याच आधारे संज्ञांचा विचार होतो. त्यातून उगीचच बोजडपणा येऊ शकतो. उदा० 'ऑथेंटिफिकेशनला' 'अधिप्रमाणन' म्हणण्याची आवश्यकता नाही. ह्या संज्ञेच्या वापराचा संदर्भ पाहिला तर 'खातरजमा' हा शब्द अधिक योग्य वाटतो.

एखाद्या गोष्टीशी अनेक संदर्भ निगडित असताना संज्ञा ही त्यातील एखाद्याच संदर्भाला महत्त्व देऊन रचलेली असू शकते. उदा० मराठीत सध्या अनेक लोक

ज्यासाठी न्याहाळक अशी संज्ञा वापरतात त्याला इंग्रजीत ब्राव्जर अशी संज्ञा आहे (त्याला अनुसरून काही लोक चाळकही म्हणतात.) ह्या दोन्ही संज्ञा ह्या ह्या गोष्टीच्या एका एका धर्माचा निर्देश करतात. मुळात संगणकावर महाजालावरील संकेतस्थळ पाहण्याची सोय करणारी संगणकप्रणाली हा अर्थ इथे मुख्य आहे आणि तो इंग्रजी आणि मराठी दोन्ही संज्ञांच्या सामान्य व्यवहारातील अर्थात तंतोतंत गवसत नाही. त्यांचा पारिभाषिक वापर लक्षात घेतला तरच ह्या संज्ञा योग्य वाटतात.

ह्या व्यवहाराचा पारिभाषिकपणा लक्षात घेणे ही एक पायरी झाली. ती लक्षात घेऊनही नव्याने एखाद्या भाषेत चपखल संज्ञा सुचवणे हे काम सोपे नाही. मराठीत नव्या संज्ञा आणताना जाणवलेल्या मर्माच्या जागा खाली मांडत आहे.

**तंतोतंत जुळणारी संज्ञा**

एका भाषेत एखादा शब्द जितक्या विविध संदर्भांशी निगडित असतो तितक्याच संदर्भांशी निगडित असलेली पर्यायी संज्ञा शोधण्यात अनेकदा भाषान्तरकारांची शक्ती खर्च होते. निदान शास्त्रीय भाषाव्यवहारात तरी बहुतेक वेळां ह्याची आवश्यकता नसते. उदा० 'यूजर इण्टरफेस'साठी मराठीत संवादपटल ही संज्ञा सुचवली तर इण्टरफेसचे इतर संदर्भ उदा० दोन संगणकीय यंत्रणांना जोडणारी मध्यस्थ यंत्रणा ही संवादपटल ह्या संज्ञेत समाविष्ट होत नाही. पण अशा विविध अर्थांसाठी वेगवेगळ्या संज्ञा वापरात येतात (संवादपटल आणि मध्यस्था) हे ध्यानात घेतले तर सगळे संदर्भ तंतोतंत जुळतील अशाच संज्ञा हव्यात हा हट्ट उरणार नाही.

**आपला सांस्कृतिक शब्दकोश**

अनेकदा असे वाटते की मराठीचा आपला सामूहिक शब्दकोश हरवत चालला आहे. आपल्याला नवा शब्द घडवायचा झाला तर आपण संस्कृतातल्या शब्दसिद्धीची प्रक्रिया अधिक वापरू जातो. (तीही बऱ्याचदा अज्ञानमूलक असते, ते असो.) संगणकाची आज्ञावली रचताना त्यात एक विशिष्ट रचनाबंध वापरतात. त्यात एखादी क्रिया विशिष्ट टप्प्यानंतर परत परत करण्यात येते. पुढची आज्ञा मिळेपर्यंत हे परत परत करणे चालूच असते. इंग्रजीत ह्या रचनाबंधाला 'लूप' असे म्हणतात. मराठीत काय म्हणाल असे विचारले तर बहुतेक लोक पुनरावर्तन वगैरे म्हणू लागतात. निष्कारण संस्कृतात शिरतात. त्याला फेरा म्हणता येईल हे आपल्याला पटकन सुचत नाही. फेरा हा शब्द एकदा सुचला की जन्ममरणाचा फेरा, फेऱ्यातून सुटणे इ० शब्दप्रयोग आठवून ही संज्ञा अधिक चपखल आहे हे



अनुक्रमणिका

सहज लक्षात येते. पण हे जरा सुचायला हवे. मराठीकरण करताना ह्या गोष्टीचे भान असल्यास मराठीकरण अधिक स्वाभाविक होईल असे वाटते.

**संस्कृतचा अनावश्यक वापर**

संस्कृतचा वापर अनेकदा नको तितका झाल्यानेही असा पारिभाषिक भाषाव्यवहार क्लिष्ट होतो. संस्कृततज्ज्ञांच्या दृष्टीने एखादा संस्कृत शब्द चपखल असला तरी मराठीत सोपा शब्द देणे शक्य असताना तो संस्कृत शब्द वापरणे टाळावे. 'नेव्हिगेटर'ला मार्गनिर्देशक म्हणण्यापेक्षा वाटाड्या म्हणणे केव्हाही चांगलेच.

**सामासिक पदांची घटकपदे**

अनेकदा स्रोतभाषेतली संज्ञा ही सामासिक स्वरूपाची असते. अशा संज्ञांना पर्यायी संज्ञा सुचवताना काळजी घ्यायला हवी. उदा० इंग्रजी संज्ञा जर सामासिक असेल तर तिच्या घटकपदांचे कोशातले अर्थ सुटे सुटे लक्षात घेऊन पर्यायी संज्ञा घडवली तर ती बऱ्याचदा अभिप्रेत संदर्भात चपखल वाटत नाही. उदा० 'बुकमार्क'चा पर्याय म्हणून पुस्तकखूण ही संज्ञा वापरली तर अर्थ कळेलच. पण स्मरणखूण अधिक बरी वाटते. मूळ अर्थ काय अभिप्रेत आहे? तर आपण नेहमी वापरतो ते संकेतस्थळांचे पत्ते पुन्हा पुन्हा लिहावे लागू नयेत म्हणून संगणकाने ते नोंदवून घेणे. हे झाले म्हणजे एकदा टिकटिकवल्याने (क्लिक केल्याने) काम भागते. ह्याला मराठीत स्मरणखूण असे म्हणणे अधिक बरे. पुस्तकखूण म्हणजे पुस्तकात ठेवायची खूण तिचा अर्थ आपण कुठवर वाचले त्याची आठवण करून देणे, त्यावरून संकेतस्थळाचा पत्ता लक्षात ठेवण्याची संगणकातली सोय एवढा लांबलचक प्रवास करण्याची आवश्यकता नाही.

**व्याकरणिक रचनाविशेष**

भाषांचे व्याकरणिक रचनाविशेष अनेकदा काही बंधने आणत असतात ती ध्यानात घ्यायला हवीत. उदाहरणच घ्यायचे तर शब्दसिद्धीच्या दृष्टीने पाहता मराठी भाषेत धातूंना आख्याताचे (म्हणजे काळ आणि आज्ञार्थ इ० अर्थ ह्यांचे वाचक असे) प्रत्यय लागताना त्यांना उपसर्ग लागत नाहीत. संस्कृत वा इंग्रजीत ते लागतात. उदा० हृ ह्या धातूपासून हरति असे क्रियापद बनते तसेच संहरति, विहरति, आहरति, प्रहरति इ० रूपे होतात. इंग्रजीत संस्कृताइतके नसतील पण री, अन् असे काही उपसर्ग लागून काही रूपे होतात. उदा० री-डू, अन्-कव्हर, ऑटो-चेक इ० मराठीत धातूला थेट उपसर्ग लागून होणारी अशी रूपे घडताना दिसत नाहीत. मराठीत पुनर् इ० शब्द नामांच्याच अगोदर येतात. उदा०

पुनर्मिलन, पुनर्विचार, फेरनिवड इ० एखादा मनुष्य फेरनिवडला असं मराठीत म्हणत नाहीत त्याला पुन्हा निवडले किंवा त्याची फेरनिवड झाली असे म्हणतात. इंग्रजीतून मराठीत अशा रूपांचे भाषांतर करताना क्रियाविशेषण आणि धातू अशा रचना वापरणे भाग आहे.

अशा प्रकल्पांत संगणकतज्ज्ञ आणि भाषेचे जाणकार अशा दोहोंचा सहभाग असायला हवा आणि त्यांची चर्चा होईल असे एखादे व्यासपीठ उपलब्ध व्हावे. असे झाल्यास ह्या प्रयत्नांचा पाया अधिक भक्कम होईल, अशी आशा वाटते. ह्या विवेचनात संज्ञांचा प्रत्यक्ष विचार केलेला नाही, पण काही गोष्टी ध्यानात घेतल्या तर मराठीकरण अधिक नेटके, अधिक स्वाभाविक होऊ शकेल असे वाटले म्हणून काही निरीक्षणे नोंदवली आहेत.

■

भ्रमणभाष : 097698 35310
ई-पत्ता : sushant.devlekar@gmail.com

**इंग्रजीचे गुलाम!**

काही वर्षांपूर्वी सोव्हियट यूनियनचे कॉन्सुलेट जनरल इगोर बोनी नागपूरला आले होते. तेव्हा येथील काही लोकांनी त्यांचे धनवटे रंगमंदिरात भव्य स्वागत केले. त्या सभेचे अध्यक्ष न्या० अभ्यंकर आणि स्वागताध्यक्ष होते कॉ० बर्धन! सत्कारमूर्तींच्या आधी ह्या दोघांची भाषणे इंग्रजीत झाली. पण त्यांचा अनुवाद करण्यात आला नाही. नंतर इगोर बोनी यांनी भाषणाला सुरुवात करताना म्हटले, ''मी इंग्रजी बोलू शकतो. पण ती विदेशी भाषा आहे. मी जर रशियन भाषेत बोललो, तर ते आपणांस समजणार नाही. आणि म्हणून मी हिंदीत बोलणार आहे.'' असे म्हणून त्यांनी हिंदुस्थानवासीयांच्या श्रीमुखात एक मखमली मारली. ते एक तास वीस मिनिटे धारावाहिक बोलले. त्यानंतर मी त्यांना माउंट हॉस्पिटलमध्ये भेटलो. तेव्हा ते मला म्हणाले, ''हिंदुस्थानी लोक तनाने स्वतंत्र झालेत, पण मनाने अजूनही इंग्रजीचे गुलाम आहेत. तुमच्या देशाला स्वत:ची राष्ट्रभाषा नाही.''

वा०रा० गाणार
(दै० सामना, उत्सव पुरवणी, दि० २७ डिसेंबर २००९)
प्रेषक : मनोहर राईलकर

# मेकॉले विरुद्ध प्रिन्सेप, प्रिन्सेप विरुद्ध ट्रेवेल्यन

अरविंद कोल्हटकर

(हे लेखन इंटरनेटवर उपलब्ध असलेल्या काही पुस्तकांवरून आणि अन्य सामग्रीचा वापर करून लिहिण्यात आलेले आहे. संकेतस्थळांचा उल्लेख तळाशी क्रमवारीने दिला आहे. पुस्तकांच्या पृष्ठांचे संदर्भ १:१२, २:२० अशा प्रकारे दिलेले आहेत.)

१८३४ सालचा हिंदुस्थान. दुसऱ्या बाजीरावाला बिठूरास पेन्शनवर पाठवल्यानंतर ब्रिटिश सत्ता हिंदुस्थानात सुस्थापित झाल्यासारखी दिसत होती. पुष्कळ भागात प्रत्यक्ष सत्ता आणि उर्वरित भागात ताटाखालची मांजरे बनलेले राजे-महाराजे आणि नवाब ह्यांमुळे एक उद्धट आत्मविश्वास सत्ताधारी वर्गामध्ये निर्माण झाला होता. युरोपीय (विशेषेकरून ब्रिटिश) संस्कृती, ज्ञान, समाज आणि वंश (तेव्हाचा शब्द, आजचा नव्हे) हे हिंदुस्थानी संस्कृती, ज्ञान, समाज आणि वंश ह्यांपेक्षा गुणतः श्रेष्ठ आहेत अशी भावना सत्ताधारी वर्गामध्ये दृढमूल होऊ लागली होती. ह्या पार्श्वभूमीवर त्या काळात ब्रिटिश राजकर्त्या वर्गामध्ये झालेल्या भाषा आणि लिपीसंबंधातल्या दोन वादांना सौकर्यासाठी शीर्षकातील सुटसुटीत नावे दिली आहेत.

ह्या दोन वादांपैकी पहिला आजही चांगलाच स्मरणात आहे. त्या वादाच्या नावातील मेकॉले म्हणजे थॉमस बॅबिंग्टन मेकॉले (१८००-५९). १८३२ ते १८३३ अखेर लंडनमधून ईस्ट इंडिया कंपनीच्या कार्यावर देखरेख करणाऱ्या बोर्ड ऑफ कंट्रोलचा सेक्रेटरी, तदनंतर १८३४ ते १८३७ अखेर ह्या काळात कलकत्त्यात गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलमध्ये लॉ-मेंबर अशी साधारण ६ वर्षे त्याचा हिंदुस्थानच्या कारभाराशी प्रत्यक्ष संबंध होता. इंडियन पीनल कोड तयार करणे हे महत्त्वाचे काम त्याने ह्या काळातच पार पाडले. ह्याखेरीज कमिटी ऑफ पब्लिक एज्युकेशनचा अध्यक्ष म्हणून त्याने जे विस्तृत टिपण लिहिले त्याचा परिणाम म्हणजे हिंदुस्थानातली शिक्षणाची पद्धत मुळापासून बदलली आणि शिक्षणाला एक नवी दिशा प्राप्त झाली. आज आपणांला दिसतो तो भारत देश तिच्यातून निर्माण झाला आहे. कमिटीच्या दहा सदस्यांमध्ये ५-५ अशी विभागणी झाली होती. पाच सदस्यांच्या मते सरकारने तोवर चालत आलेले शैक्षणिक धोरणच पुढे चालवावे, ज्यायोगे सरकार जुन्या पद्धतीच्या संस्कृत, अरेबिक आणि पर्शियनच्या अभ्यासावर भर देणारे धोरणच चालू ठेवील. उर्वरित

पाच सदस्य इंग्रजी भाषा आणि आधुनिक ज्ञान देणाऱ्या नव्या पद्धतीचा आग्रह धरत होते. (ह्या दोन विचारांना पुढील लेखनात अनुक्रमे पौर्वात्य आणि पाश्चात्य असे संक्षेपाने संबोधले आहे.) कमिटीचा अध्यक्ष म्हणून मेकॉलेने जे भारदस्त टिपण (minute) लिहिले त्यामुळे पारडे पाश्चात्य पक्षाच्या बाजूस झुकले आणि तेव्हापासून इंग्रजी भाषेची चलती हिंदुस्थानात सुरू झाली. मेकॉलेचे मूळ पूर्ण टिपण केव्हाच गहाळ झाले आहे असे दिसते. पण त्याचा पुष्कळसा भाग तळटीप ५ मध्ये उपलब्ध आहे. टिपण संक्षेपाने पाहायचे असेल तर ३:४०९ वाचा. टिपणातील काही विधाने आज भारतीयांना रुचणारी नाहीत पण ती तत्कालीन पूर्वग्रह आणि समजुतींची द्योतक असल्याने मेकॉलेला आज त्यावरून झोडपण्यात काहीच तथ्य नाही.

ह्या वादातील पराभूत पौर्वात्य पक्षाचा प्रमुख म्हणजे हेन्री थॉबी प्रिन्सेप (१७९२-१८७८) आणि जेम्स प्रिन्सेपचा थोरला भाऊ. हाही कलकत्त्यातील उच्चपदस्थांपैकी एक होता. गव्हर्नर जनरल विल्यम बेंटिंकचा अंतिम निर्णय त्याच्या पौर्वात्य पक्षाच्या विरोधात गेल्यामुळे कमिटीच्या सदस्यत्वाचा त्याने राजीनामा दिला. ह्यावरून पहिल्या वादाला मेकॉले विरुद्ध प्रिन्सेप असे नाव दिले आहे.

दुसऱ्या वादातील प्रिन्सेप म्हणजे जेम्स प्रिन्सेप (१७९९-१८४०). ब्राह्मी लिपीची उलगड करून भारताच्या प्राचीन इतिहासाचे दालन उघडणारा. वर उल्लेखिलेल्या हेन्री थॉबीचा धाकटा भाऊ. ह्याच्या स्मृतिप्रीत्यर्थ बांधलेले स्मारक आजही कलकत्त्यात प्रिन्सेप घाट ह्या स्थानावर उभे आहे. वादातल्या विरोधी पक्षाचा मुख्य प्रतिनिधी चार्ल्स एडवर्ड ट्रेवेल्यन (१८०७-१८८६). अगदी तरुण वयात हा हिंदुस्थानात कंपनी सरकारच्या नोकरीत आला आणि भराभर वर चढत १८३४ सालापर्यंत वयाच्या २७व्या वर्षी गव्हर्नर जनरलच्या निकटवर्तीय वर्तुळात त्याची गणना होऊ लागली होती (३:३९१). भारतीय भाषा लिहिण्यासाठी त्यांच्या चालू लिपीच योग्य आहेत की सर्व भारतीय भाषांना रोमन लिपी लागू करावी ह्या मुद्यांवर हा दुसरा वाद खेळला गेला. प्रिन्सेपसारख्या पौर्वात्यांच्या मते रोमन लिपी भारतीय भाषा लिहिण्यासाठी पुरेशी पडली नसती आणि चालू पद्धतीत बदल करण्याचे काहीच कारण नव्हते. ट्रेवेल्यनसारख्या पाश्चात्त्यांच्या मते रोमन लिपीच्या मार्गाने युरोपीय ज्ञानाचा हिंदुस्थानात प्रवेश आणखी सुकर झाला असता. अमेरिकन आणि अन्य मिशनरी प्रयत्नांमध्ये धर्मप्रसारासाठीची पुस्तके एतद्देशीय भाषांमध्ये पण रोमन लिपीत छापण्याची सुरुवात झालीच होती. मिशनरी वर्गाचा कल साहजिकच रोमन लिपीकडे होता. पहिल्या वादाचा निर्णय सरकारी पातळीवरून करण्यात आला. दुसऱ्या वादात मात्र सरकारी पातळीवर

काहीच स्वारस्य दाखविण्यात आले नाही. परिणामतः त्याचे स्वरूप दोन खाजगी पक्षांमधले मतान्तर एवढेच मर्यादित राहिले. कमी-अधिक जोराने हा वाद पुढची साठ-एक वर्षे चालू राहिला, पण तेवढ्या काळात देशी भाषांचीच बरीच प्रगती झाल्याने आणि त्यांच्यामध्येच बरीच ग्रंथसंपदा निर्माण झाल्याने ह्या वादातली हवाच निघून गेल्यासारखे झाले. १८५७च्या उठावानंतर प्रजेला उगीचच डिवचणेही राज्यकर्त्यांना शहाणपणाचे वाटले नसावे.

पहिल्या वादामध्ये निर्णय सरकारी पातळीवरून केला जाण्याचे कारण म्हणजे तो वाद १८१३ सालच्या चार्टर कायद्यामध्ये वापरण्यात आलेल्या 'लर्नेड नेटिव्हज ऑफ इंडिया' (सुशिक्षित एतद्देशीय) ह्या शब्दांचा अर्थ कसा लावायचा ह्या कायद्याच्या मुद्याभोवती केन्द्रित होता. मेकॉलेच्या टिपणामधून हे स्पष्ट दिसून येते. तो म्हणतो : (५)

''... सार्वजनिक शिक्षण-कमिटीच्या काही सदस्यांच्या मते आजतागायत चालत आलेली पद्धती हीच काय ती ब्रिटिश संसदेने १८१३ मध्ये पुरस्कृत केलेली पद्धती आहे... मला नाही असे वाटत की संसदेने केलेल्या कायद्याचा कशाही मार्गाने अर्थ लावला तरी त्यामधून सध्या लावलेला अर्थ काढता येईल. अमुकच भाषा किंवा अमुकच शास्त्र असे काहीही कायद्यात उल्लेखिलेले नाही. वाङ्मयाचे पुनरुज्जीवन आणि विकास आणि सुशिक्षित एतद्देशीयांना उत्तेजन अशा हेतूने आणि ब्रिटिश सत्तेखालच्या भागातील रहिवाशांमध्ये शास्त्रीय ज्ञानाचा प्रवेश आणि विकास व्हावा अशा हेतूने काहीएक रक्कम बाजूस काढून ठेवण्यात आली आहे. ह्यावरून असे मांडण्यात येत आहे किंवा असे गृहित धरून चालण्यात येत आहे की संसदेच्या मते वाङ्मय म्हणजे केवळ अरेबिक वा संस्कृत वाङ्मय. मिल्टनची कविता, लॉकचे तत्त्वज्ञान वा न्यूटनचे पदार्थविज्ञान ह्यांच्याशी परिचय असणाऱ्या एतद्देशीयाला जणू सुशिक्षित एतद्देशीय ही उपाधी संसदेने लावलीच नसती. कुश दर्भाचे उपयोग आणि परमेश्वरात विलीन होण्याचे रहस्य हिंदूंच्या पवित्र ग्रंथांतून शिकलेल्यांनाच जणू ही उपाधी लागावी, हा अर्थ समाधानकारक आहे असे मला वाटत नाही.''

अशा रीतीने चार्टर कायद्याचा अर्थ लावण्याचा प्रसंग पडल्याने आणि 'सुशिक्षित एतद्देशीय' ह्या शब्दांचा अर्थ 'युरोपीय ज्ञान घेतलेले' असा प्रस्थापित झाल्याने जुन्या पद्धतीचे शिक्षण थांबवून त्याच्या जागी नव्या पद्धतीचे शिक्षण देण्यात यावे हा निर्णय सरकारी पातळीवरून करण्यात आला. हा निर्णय जरी हिंदुस्थानी प्रजेच्या भविष्यावर कायमचा परिणाम करणारा होता तरी तो घेतला गेला कलकत्तेकर इंग्रजांच्या छोट्या उच्च वर्तुळात. आपल्या आणि आपल्या

देशाच्या भवितव्यावर मूलभूत परिणाम करणारा असा काही निर्णय घेतला जात आहे ह्याची हिंदुस्थानी प्रजेला ना जाणीव होती ना काळजी. लिपिबदलाबाबत कोणताच कायदा वाटेत येत नसल्याने काहीच निर्णय झाला नाही आणि जैसे थे परिस्थितीच चालू राहिली. माझ्या मते हिंदुस्थानी प्रजेचे हे मोठेच सुदैव म्हणायचे. नपेक्षा राज्यकर्त्यांच्या ह्याच उच्च वर्तुळाने एका फटक्यात देवनागरीसहित सगळ्या लिपी निकालात काढल्या असत्या आणि त्या जागी रोमन लिपीची स्थापना केली असती. ह्या 'सुधारणेचे' परिणाम हिंदुस्थानी प्रजेने कायमचे भोगले असते. ह्या विषयीचे माझे वैयक्तिक मत ह्या लेखनाच्या अखेरीस विस्ताराने लिहिले आहे. येथे एवढेच लिहितो की सर्वविनाशाच्या गर्तेपासून आपण थोडक्यात वाचलो आणि त्यामुळे आज भारत एक सामर्थ्यवान राष्ट्र म्हणून जगात मानाने उभा आहे.

(हा संपूर्ण वाद क्र० १ येथे दर्शविलेल्या जागी वाचावयास उपलब्ध आहे. तेथील पल्लेदार इंग्रजीतील लांबलचक टिपणे वाचायची नसतील तर त्यांचा उत्तम सारांश क्र० २मध्ये प्रोफेसर आणि शब्दकोशकार मोनियर विल्यम्स ह्यांनी लिहिला आहे. ह्या वेळेपर्यंत त्यांचे आडनाव विल्यम्स एवढेच होते. पुढे १८८६ साली त्यांना KCIE ही पदवी मिळाली तेव्हा त्यांनी आपल्या आडनावात 'मोनियर' हा शब्द जोडला आणि ते मोनियर मोनियर-विल्यम्स अशा double-barelled आडनावाने ओळखले जाऊ लागले. (७)

लिपीसंबंधीच्या वादाची सुरुवात एका छोट्या बाबीवरून झाली. थॉमसन नावाच्या दिल्लीस्थित इंग्रजाने ट्रेवेल्यनच्या सूचनेवरून रोमन लिपीत एक इंग्रजी-उर्दू शब्दकोश तयार केला. त्याच्या प्रती कलकत्त्यातील स्कूल बुक सोसायटीने विकत घ्याव्या काय असा प्रस्ताव सोसायटीपुढे आला. तिचे दोन सदस्य जेन्स प्रिन्सेप आणि टायटलर ह्यांनी हिंदुस्तानी भाषांसाठी रोमन लिपी वापरण्याचे काहीच कारण नाही असे त्रोटक शेरे मारून आपला विरोध नोंदवला. उत्तर म्हणून ट्रेवेल्यनने विस्तृण टिपण लिहिले. तद्नंतर मूळ मुद्दा दूर राहून रोमन लिपी हिंदुस्थानातील भाषांना लागू करणे योग्य की अयोग्य हा वाद सुरू झाला. मिशनरी लोकांना ह्या प्रश्नात रस असल्याने त्यांच्या सेरामपूर प्रेसने १८३४ सालीच ह्या संपूर्ण वादातील मतमतान्तरे एकत्र करणारे पुस्तक छापले. (ते पुस्तक क्र० १ येथे उपलब्ध आहे.) ह्या वादावर सरकारच्या बाजूने काहीच अधिकृत प्रतिक्रिया आलेली दिसत नाही. हे एक मोठेच आश्चर्य आहे. परिणामतः वादाचा काहीच निर्णय न होऊन परिस्थिती पूर्ववत चालू राहिली. मोठेच आश्चर्य असे मी म्हणतो ह्यामागे एक मनोरंजक कारण आहे आणि ते पाहण्यासाठी थोडे विषयांतर करावे लागेल.

मेकॉले हिंदुस्थानात आला तेव्हा तो अविवाहित होता. आपल्या दोन बहिणींवर त्याची फार माया होती आणि त्या दोघींपैकी धाकटी हॅना हीही अविवाहित असून भावाबरोबरच हिंदुस्थानात आली. (लग्नाच्या हेतूने, दुसरे काय? तेव्हाची ती पद्धत होती.) कलकत्त्यात आल्यावर चार्ल्स ट्रेवेल्यन हा उपवधू आणि उज्ज्वल भवितव्य असलेला तरुण तिच्या प्रेमात पडला आणि डिसेंबर १८३४मध्ये त्यांचा विवाह झाला. मेकॉलेला हा विवाह पूर्णपणे पसंत होता, कारण ट्रेवेल्यनबद्दल त्याचे फार चांगले मत होते. दोघांना जरी उत्तम पगार असले तरी दोघेही मूळचे मध्यमवर्गीय होते आणि बचत करून ती मायदेशी पाठवण्याची दोघांनाही आवश्यकता होती. ह्या कारणाने विवाहानंतर नवविवाहित दांपत्य आणि मेकॉले एकाच घरात राहिले (३:३९४). (ह्याच घराच्या जागेवर सध्याचा प्रतिष्ठित बेंगाल क्लब उभा आहे (३:३८९). पाश्चात्य विरुद्ध पौर्वात्य शिक्षण हा पहिला वाद ह्याच सुमारास चालू होता, कारण मेकॉलेचे टिपण २ फेब्रुवारी १८३५ ह्या दिवशी लिहिले गेले (क्र० ५). मेव्हणे मेव्हणे आणि एकाच घरात राहणारे असूनही ट्रेवेल्यनने लिपीच्या प्रकरणातही रस घ्यायला मेकॉलेला उद्युक्त केल्याचे दिसत नाही. रोजच्या रोज डिनर टेबलवर ते काय बोलत होते ह्याबाबत काहीच नोंद उपलब्ध नाही. जर मेकॉलेने भाषेबरोबर लिपीच्या कामातही लक्ष घातले असते तर अजून एक भारदस्त टिपण लिहून ह्याही प्रश्नाचा कायमचा निकाल त्याने लावला असता. (जाता जाता असाही उल्लेख करावासा वाटतो की क्र० ३चे मेकॉलेचे चरित्र त्याचा भाचा आणि हॅनाचा मुलगा जॉर्ज ओटो ट्रेवेल्यन ह्याने लिहिलेले आहे.)

कालान्तराने मेकॉले आणि ट्रेवेल्यन दोघेही इंग्लंडला परतले. चार्ल्स ट्रेवेल्यन १८५९मध्ये हिंदुस्थानात परत आला. मद्रासचा गव्हर्नर आणि व्हाइसरॉयच्या कौन्सिलात अर्थविभागाचा सदस्य म्हणून १८६५ पर्यंत तो पुन: हिंदुस्थानात होता. लिपीचा विषय तो विसरला नव्हता. इंग्लंड सोडण्यापूर्वी ह्या विषयाचा तेथे पाठपुरावा करण्याचे काम त्याने मोनियर विल्यम्सकडे सोपवले होते. १८३४मध्ये झालेला वाद आणि नंतर इंग्लंडातील वृत्तपत्रात छापलेले लिखाण एकत्रित करून मोनियर विल्यम्सने जे पुस्तक प्रसिद्ध केले ते क्र० २ येथे उपलब्ध आहे. ह्याही प्रयत्नातून काही निष्पन्न झाल्याचे दिसत नाही.

मिशनरी लोकांनाही ह्या लिपीच्या प्रकरणात रस होता असे वर म्हटलेले आहेच. आपल्यापरीने धर्मप्रचाराची भाषान्तरित पुस्तके रोमन लिपीत छापून प्रसिद्ध करण्याचे त्यांचे कार्य चालूच होते. ह्या विषयाला खास वाहिलेले एक मासिक लाहोरमध्ये चार-पाच वर्षे तरी प्रकाशित होत होते. ह्या मासिकाच्या

पहिल्या आणि पाचव्या वर्षांचे अंक क्र० ४ येथे उपलब्ध आहेत. मासिकाच्या पृष्ठभागावरच त्याचा हेतू रोमन-उर्दू जर्नल - पौर्वात्य भाषांसाठी रोमन लिपीच्या पुरस्कारार्थ (Roman-Urdu Journal. To advocate the use of Roman Alphabet in Oriental Languages) असा नोंदवलेला आहे. हे अंक चाळले तर रोमन लिपीच्या चळवळीतली हवा निघून जायला लागल्याचे लक्षात येते. पंजाब विद्यापीठाशी संबंधित असलेल्या आणि अन्यही बऱ्याच प्रतिष्ठित हिंदू आणि मुस्लिम व्यक्तींची मते अंकात वेळोवेळी छापलेली आहेत आणि त्या सर्वांनी रोमन लिपीला विरोध केल्याचें दिसते. खुद्द सरकारलाही ह्या विषयात काहीच रस नसल्याचे दिसून येते. उदाहरणार्थ खंड ५, अंक ४६, पृष्ठ २५ पाहा. डॉ० डब्ल्यू० सेंटर नावाच्या लेखकाने सरकारी पातळीवर हा प्रस्ताव उचलून धरायला विरोध केला आहे. लोकांना हा प्रस्ताव मान्य आहे का नाही ह्या चाचणीवरच त्याचे यशापयश ठरविले पाहिजे, सरकारी हस्तक्षेपाची आवश्यकता नाही असे त्याने नमूद केले आहे. पंडिता रमाबाई ह्यांचेही नाव विरोधक म्हणून एका ठिकाणी आलेले आढळते. खंड ५, अंक ५० पृष्ठ १७ येथे Lady-Pandit "Ramabai" and Roman character असा एक लेख आहे. त्यावरून कळते की रमाबाईंनी जणू संस्कृत भाषाच विलाप करत आहे अशी कल्पना करून एक काव्य करून ते काव्य पूर्वीच्या वर्षी म्हणजे १८८१ साली बर्लिनमधल्या प्राच्यविद्या तज्ज्ञांच्या काँग्रेसकडे पाठवले होते आणि मोनियर विल्यम्स ह्यांनी त्या काव्याचे भाषान्तर करून दिले होते. प्रस्तुत काव्यातील दोन भाग येथे वाचावयास मिळतात. एव्हांना देशी भाषांमध्ये त्या त्या लिपी वापरून बरीच ग्रंथनिर्मिती झालेली असल्याने आणि १८५७च्या घटनांच्या नंतर ही खाजवून खरूज काढण्यात सरकारला काही स्वारस्य वाटत नसावे.

१८३४ साली लिपीबदलाला सर्वांत अधिक अनुकूल वातावरण होते तरीही तो बदल होऊ शकला नाही. ह्यामुळे हिंदुस्थान आणि नंतरचा भारत देश मोठ्याच आपत्तीतून वाचला असे पूर्वी म्हटले आहे ते का ह्यावर दोन शब्द लिहितो.

राजकीय पातळीवर सत्ता केंद्रित असलेला एकसंध देश इंग्रजांनी निर्माण केला. तरीही तत्पूर्वी दोन-अडीच हजार वर्षे हा देश सांस्कृतिक पातळीवर एकत्रच होता. मुस्लिम, शीख, पारसी, ज्यू असे अन्य प्रवाह आले तरी तेही ह्या सांस्कृतिक एकसंधतेचा भाग होऊन गेले. संस्कृत भाषा, त्यात निर्माण झालेले तत्त्वज्ञान आणि विचार, त्यातील वाङ्मय आणि त्याच गोष्टींचा पुढे देशी भाषांमध्ये झालेला विकास हे ह्या एकसंधतेला प्रामुख्याने पायाभूत आहेत असे मला वाटते. केरळमधल्या भारतीयाला बंगालमधला किंवा पंजाबमधला भारतीय फार दूरचा

वाटत नाही ह्यामागे हे समान धागे आहेत. ह्याउलट १८३४मधला हिंदुस्थान अगदीच स्वत्व गमावलेला आणि पराभूत अवस्थेतला समाज होता. इंग्रज जे म्हणतील ते करायला तो तयार होता. इंग्रजांनी तेव्हा इथल्या लिपींना राजाश्रय काढून घेतला असता आणि रोमन लिपी राजकीय पातळीवरून प्रसारित केली असती तर केवळ रोमन लिपी शिकलेली हिंदी प्रजा दहा-पंधरा वर्षांतच इथल्या लिप्या विसरायला लागली असती. वापर नसला तर एखादी लिपी संपूर्ण विस्मरणात जायला फार वेळ लागत नाही. ब्राह्मी आणि खरोष्ठी ह्या प्राचीन लिप्यांचे हेच झाले. अगदी अलीकडचे आपल्या मोडीचेच उदाहरण घ्या. १९४०-५० पर्यंत बऱ्याच जणांना जुजबी का होईना, मोडी वाचता येत असे. शाळांमधून मोडी बंद झाल्यावर ३०-४० वर्षांतच अशी स्थिती निर्माण झाली की आत्मविश्वासपूर्वक मोडी वाचणाऱ्यांची संख्या वीसपंचविसावर येऊन पोहोचली. महाराष्ट्राच्या इतिहासाचा अभ्यास करू इच्छिणारे काहीजण प्रयत्नपूर्वक मोडी वाचायला शिकतात कारण आजच्या काळात हेही कोणीतरी केले पाहिजे ही जाणीव आपल्यामध्ये आहे. १८३४ साली कोणीही असा प्रगल्भ विचार केला असता असे वाटत नाही. लवकरच सर्व भारतीय लिप्या पूर्ण विस्मरणात गेल्या असत्या आणि त्या त्या लिप्यांमध्ये लिहिलेली असंख्य पुस्तके आणि कागदपत्रे दुर्लक्षित अवस्थेत कोणाकोपऱ्यांच्या माळ्यावर पडून राहिली असती. नशिबाने एखाद्दुसरे पुस्तक रोमन लिपीतून छापले गेलेही असते, पण बहुतेकांची वाटचाल वाळवी, ओलावा, धूळ ह्या परिचित मार्गाने होऊन ती नष्ट तरी झाली असती किंवा पूर्ण विस्मरणात गेली असती. आपल्या भूतकाळाचे ज्ञान आणि त्याच्या अस्तित्वाची जाण ह्या अनमोल ठेव्याला आपण पूर्णपणे मुकलो असतो. उरले असते ते केवळ जातीजमातीतील, भाषांभाषांतील आणि अन्य अनेक प्रकारचे भेद. त्यांची आपल्याकडे मुळीच टंचाई नाही. भूतकाळ विसरलेल्या समाजांचे भविष्य कसे असते हे आपण आफ्रिका किंवा दक्षिण अमेरिकेच्या उदाहरणांवरून पाहू शकतो. भारतीय समाजाला एकत्र बांधून ठेवणारे घट्ट सिमेंट नाहीसे झाल्यावर इथे पुढेमागे कायमचे अराजक माजले असते आणि आजचा सामर्थ्यवान भारत कदाचित निर्माणच झाला नसता. १८३४च्या काळातला दीनदलित हिंदुस्थान कदाचित पुन्हा डोके वर काढूच शकला नसता असे मला वाटते.

सर्व भारतीय भाषा रोमन लिपीमध्ये लिहिल्या जाव्यात अशी मागणी करणारे काही गट आजही आसपास आहेत. ह्या आजच्या चळवळींचे मूलस्रोत अगदी वेगळे आहेत आणि १८३४च्या मागणीशी त्यांचे काहीच साधर्म्य नाही. ते केवळ नावापुरतेच एकासारखे एक दिसतात. प्रस्तुत लेखनात ह्या आजच्या मागणीबद्दल काहीही मतप्रदर्शन केलेले नाही असे मुद्दाम नमूद करावेसे वाटते.

**संदर्भ**

१) The application of the roman alphabet to all the Oriental Languages ... सेरामपूर प्रेस. १८३४. http://tinyurl.com/yyt2x4q

२) Original papers illustrating the history of the application of the Roman Alphabet to the Languages of India. संपादक मोनियर विल्यम्स. १८५९. http://tinyurl.com/y2s5a6b

३) The Life and Letters of Lord Macaulay. Vol. 1 जॉर्ज ओटो ट्रेवेल्यन १८८० http://tinyurl.com/y2zbqbq

४) Roman-Urdu Journal Vol. 1, Civil and Military Gazette Press लाहोर १८७८
http://tinyurl.com/2852g8n Roman-Urdu Journal Vol. 5, Civil and Military Gazette Press. लाहोर. १८८४.
http://tinyurl.com/y6cz3ov

५) http://www.languageinindia.com/april2003/macaulay.html

६) '... the opinion of some of the gentlemen who compose the Committee of Public Instruction, that the course which they have hitherto pursued was strictly prescribed by British Parliament in 1813,...

It does not appear to me that the Act of Parliament can, by any art of construction, be made to bear the meaning which has been assigned to it. It contains nothing about the particular languages or sciences which are to be studied. A sum is set apart 'for the revival and promotion of literature and the encouragement of the learned natives of India, and for the introduction and promotion of a knowledge of the sciences among the inhabitants of the British territories.' It is argued, or rather taken for granted, that by literature, the Parliament can have meant only Arabic and Sanscrit literature, that they never would have given the honorable appellation of 'a learned native' to a native who was familiar with the poetry of Milton, the Metaphysics of Locke, and the Physics of Newton; but that they meant to designate by that name only such persons as might have studied in the sacred



अनुक्रमणिका

books of the Hindoos all the uses of cusa-grass, and all the mysteries of absorption into the Deity. This does not appear to be a very satisfactory interpretation.'

७) http://www.shikshapatri.org.uk/~imagedb/content.php/monier

संदर्भ बघण्यासाठी tinyurl.com ने काम न केल्यास books.google.com येथील शोधपेटी (search-box) मध्ये पुस्तकाचे नाव घालूनही पुस्तक सापडेल.



313-38 एल्म स्ट्रीट
टोरांटो, ओन्टारिओ M5G 2K5, कॅनडा
दूरभाष : (+1) (416) 340 0881
ई-पत्ता : kolhatkar@hotmail.com

**अरबी 'फी'**

अरबीत 'फी' म्हणजे 'आहे'. हा फी शब्द घातला की त्या परीसस्पर्शाने बाकीच्या कसल्याही सावळ्या गोंधळाची व्याकरणशुद्ध अरबी होते अशी बहुतेक भारतीयांची समजूत असते.

सहा वर्षं उम्म खद्रामध्ये काम केल्यावर आमची लेबर वॉर्डातली नर्स, शकू, एखाद्या पहिलटकरणीला नीट कळा द्यायला सांगताना म्हणे,

'अना फी कलाम फी अन्ता फी अहसन.' (शब्दशः = मी आहे बोलते आहे तू आहेस अधिक चांगला) (अभिप्रेत = मी सांगते आहे ते तुझ्या भल्यासाठीच)

पहिलटकरीण ही अरबीची फे फे जाणतेपणाने समजून घेई!

डॉ० उज्ज्वला रेगे, 'सोन्याच्या धुराचे ठसके', पृ० ११०

# धुळे जिल्ह्यातील दलित स्त्रियांच्या ओवीगीतांतील बहीण-भाऊ

**प्रकाश भामरे**

भारतीय संस्कृतीत प्रत्येक नात्याचे विशिष्ट असे स्थान ठरलेले आहे. प्रत्येक नात्यामागे विशिष्ट भूमिका, पावित्र्य, कर्तव्य दडलेले आहे. नात्याप्रमाणे प्रत्येकाचे वर्तन संस्कृतीसंवर्धन ठरते. नातेसंबंधातील वितुष्ट संस्कृतीला लागलेले ग्रहण मानले जाते. धुळे जिल्ह्यातील दलित समाज, म्हणजेच पूर्वाश्रमीचा महार समाज लोकसंस्कृतीचा पूजक राहिलेला आहे. आधुनिक काळातसुद्धा प्रत्येक नात्यामधील संकेत हा समाज पाळताना दिसतो.

दलित समाजातही इतर समाजांप्रमाणे बहीण-भावाच्या नात्याला अतिशय पवित्र मानले जाते. रक्षाबंधन, भाऊबीज, अक्षयतृतीया म्हणजेच 'आखाजी' अशा प्रकारच्या सणांच्या वेळी बहिणींचे भावांच्या घरी येणे लोकसंस्कृतीला धरून आहे. यातून नात्यांमधील ओलावा, जिव्हाळा टिकून राहतो अशी या समाजाची धारणा आहे. 'दिवाई-आखाजी' हे दोन सण ग्रामीण दलित समाजात अतिप्रिय आहेत. याप्रसंगी भावा-बहिणींच्या नात्यामध्ये भावजय धोंडा ठरते. हा आशय व्यक्त करताना एक दलित स्त्री म्हणते -

''भाऊ आनी बहीन एक वेलनं वाईक
भवजाई कुत्सीत, तिनी तोडी करा लोक''
''बंधो कसा म्हने, मन्ही बहीनले वाढ दही
भवजाई कशी म्हने, दूधमा मुरन टाकं नही''
''बंधो कसा म्हने, मन्ही बहीनले वाढ दूध
कसं वाढू दूध, तठे मूरन टाकी दिधं''
''बंधो कसा म्हने, मन्ही बहीनले रांध रोट्या
कशा रांधू रोट्या, तुम्हे लयेल गहू पोट्या''

पत्नीचा स्वभाव कुत्सित असल्यामुळे भाऊ आपल्या बहिणीला मनाप्रमाणे पाहुणचार करू शकत नाही, ही वेदना प्रस्तुत ओव्यांमधून मुखर होते. भाऊ चांगला आहे. परंतु भावजय कुस्वाभावाची असल्याकारणाने ती बहीण-भावाच्या नात्यामध्ये वितुष्ट आणण्याचा वारंवार प्रयत्न करीत असते. नवऱ्याचे सांगणे काही ना काही खोटी कारणे देऊन टाळत असते. सख्ख्या भावाला तोडून तिने

परके केले अशी बहिणीची वेदना आहे. भाऊ बहिणीला दही, दूध, पोळ्या वगैरे खाऊ घालण्यासाठी आपल्या पत्नीला सांगतो. परंतु पत्नी वेगवेगळी उत्तरे देऊन आपल्या नणंदेला अवमानित करत राहते. प्रस्तुत ओव्या नणंद-भावजयच्या नात्यांतील ताण-ताणवांवर प्रकाश टाकतात.

''धाकला मुराई, नको धाडीस वं मायबाई
आंबांनी आमराई, राघो-मयनाना जीव भ्याई''
''बहीन भाऊना झगडा, व्हयना आंबाना बनमा .
बहीनना डोये पानी, भाऊ पस्ताये मनमा''
''मन्हा माहेरना वाटे, बाभूय बन बहू दाटे
बंधो येईन लेवाले, माले भ्याव मोठा वाटे''

सासुरवाशी मुलीला घेण्यासाठी जाणाऱ्या भावाला 'मुराई' असे म्हणतात. 'मूय' घ्यायला जातो तो मुराई होय. हा मुराई शक्यतोवर सासुरवाशी मुलीचा लहान भाऊच असतो. 'धाकला मुराई' म्हणजे लहान भाऊ. मला घ्यायला माझ्या लहान भावाला पाठवू नकोस अशी विनंती ही सासुरवाशी मुलगी आपल्या मायबाईला म्हणजेच आईला करते. कारण रस्त्यात आंब्याच्या घनदाट आमराया आहेत. पायी प्रवास करायचा असल्याने, पुन्हा मुराई लहान असल्याने व मी बाई माणूस असल्याने आम्हां दोघां भावा-बहिणीला भीती वाटते. परतीच्या प्रवासात बहीणभावाची शाब्दिक बोलाचाल होते. तेव्हा बहीण ही मातृहृदयी असल्यामुळे तिच्या डोळ्यांत अश्रू येतात. हे डोळ्यांतले अश्रू बघून भाऊ मनात पश्चात्ताप करतो. उगीच आपण आपल्या बहिणीला बोललो असे त्याचे मन त्याला खाते. बहीण-भावामध्ये वेळप्रसंगी छोटे-मोठे भांडण जरी झाले, तरी ते क्षणिक असते. रक्ताची नाती चिवट असतात. ती तुटता-तुटत नाहीत हेच खरे.

''घोडावर जिन बांध, बंधो निंघना रागे रागे
कशी येऊ तुना संगे, घर-जोजार मन्हा मांगे''

'आखाजी-दिवाई'च्या निमित्ताने भाऊ-बहिणीला माहेरी नेण्यासाठी तिच्या गावी येतो. तिने माहेरी येण्याचे नाकारल्यामुळे त्याला राग येतो. तेव्हा ती आपल्या 'बंधो'ला म्हणते, मला तुझ्यासोबत येण्यात आनंदच वाटला असता; परंतु माझ्यामागे 'घर-जोजार' म्हणजे कौटुंबिक जबाबदाऱ्या इतक्या आहेत की, ते सर्व सोडून मी तुझ्यासोबत येऊ शकत नाही. ही खंत ती आपल्या भावाजवळ बोलून दाखविते.

''गरीब दुब्या भाऊ, परतेक बहीनले राहो,
हलका-भारी खन, एक रातना उत्सव''

बहिणीच्या आयुष्यातील भावाचे स्थान किती महत्त्वाचे आहे हे प्रस्तुत ओवीमधून अप्रतिमपणे व्यक्त झाले आहे. प्रत्येक बहिणीला भाऊ असलाच पाहिजे. भाऊ नसलेली बहीण किंवा बहिणी 'आखाजी-दिवाई'च्या सणांना उपरेपणाचा अनुभव घेताना आढळतात. म्हणून भाऊ असलाच पाहिजे. तो गरीब असो, श्रीमंत असो, बहिणीला एक रात्रीसाठी उतरायला माहेरी एक हक्काची जागा मिळते. एका रात्रीच्या भावाच्या घरचा मुक्काम म्हणजे बहिणीच्या दृष्टीने मोठा उत्सवच ठरतो. आई-वडिलांच्या नंतर तिला माहेरपण अनुभवण्यासाठी हक्काचे घर भावाचेच असते. म्हणून प्रस्तुत ओवीगीतातील बहीण आपल्या आयुष्यातील भावाच्या अस्तित्वाची अपरिहार्यता बोलून दाखविते. सासरकडचे लोक कितीही श्रीमंत असले तरी गरीब दुबळ्या भावाचे घर किंवा त्याने केलेला खण-चोळीचा पाहुणचार तिला स्वर्गसुखापेक्षा कमी वाटत नाही.

''मन्हा बंधोना घरले, सजे चुनगजी वट्टा,
बंधोनी कया न्याव, पाटील व्हयना खट्टा''

प्रस्तुत ओवीतील बहीण आपल्या भावाच्या न्यायप्रिय स्वभावाची स्तुती करताना दिसते. 'चुनगजी वट्टा' हे पूर्वीच्या काळी महार वस्तीत वैभवाचे लक्षण मानले जायचे. या 'चुनगजी वट्ट्या'वर बसून माझा भाऊ न्यायनिवाड्याचे काम करतो. त्याच्या न्यायातील निरपेक्षता ऐकून गाव पाटलालाही शरमेने मान खाली घालावी लागते. 'खट्टा' होणे म्हणजे अपराधीपणाची जाणीव होणे. महार जातीत न्यायनिवाड्याचे काम 'नाईक' महार करायचा. हा नाईक इतरांपेक्षा बौद्धिक दृष्ट्या श्रेष्ठ समजला जायचा. 'नाईक' असणे त्याच्या कुटुंबियांच्या दृष्टीने अभिमानाची गोष्ट मानली जायची. या 'नाईक' भावाची बहीण त्याची स्तुती करत आहे.

''बंधो मन्हा राजबिंदा, भवजाई चंदरकोर,
बंधोनी काढी गाडी, गावले पडना घोर''

एका प्रेमळ बहिणीचे हृद्गत प्रस्तुत ओवीतून व्यक्त होते. माझा भाऊ व भावजय इतके देखणे आहेत की, त्यांच्याकडे पाहून संपूर्ण गाव चकित होते. सगळ्यांना त्यांच्या सुरूपतेचा हेवा वाटतो. भाऊ-भावजयविषयीच्या आत्यंतिक अभिमानातून अशा अतिशयोक्तिपूर्ण ओव्यांची निर्मिती झालेली आहे.





अनुक्रमणिका

''हाई जग-संसारमा, कितलं से गनगोत,
बहीण-भाऊनं नातं, मानिक-मोत्यानी पोत''

जगात अनेक प्रकारचे' नातेसंबंध आहेत. परंतु त्या नातेसंबंधांना बहीण-भावाच्या नात्याची सर येणार नाही. बहीण-भाऊ एका माळेतील माणिक व मोती आहेत. अशी हृद्य भावना प्रस्तुत ओवीतून व्यक्त होते.

''भाऊ-बहिननं नातं, जग बये दखीसन
तुन्हा जीवना करता, ऊनू कंदील लायीसन''

प्रेमळ बहिणीचा तिच्या भावाविषयीचा आत्यंतिक जिव्हाळा प्रस्तुत ओवीतून व्यक्त झाला आहे. भाऊ आजारी पडल्यावर रात्र-पहाट न पाहता त्याला पाहण्यासाठी रात्रीचा कंदील लावून येते. पूर्वीचा काळ पायी प्रवासाचा व कंदील-दिव्यांचा काळ होता. अशा काळातही लोकांनी त्या-त्या नात्यातील प्रेम-जिव्हाळा जोपासलेला आढळतो. बहिणीला निसर्गतःच भावाविषयी भावनिक ओढ असते. सर्व नातेसंबंधात बहीण-भावाचे नाते पवित्र मानले जाते. विवाहानंतर या नात्यातला दुरावा वाढत असला तरी हे रक्ताचे नाते असल्यामुळे ते मरेपर्यंत तुटत नाही. बहिणीच्या अंतःकरणातील भावाविषयीच्या ममतेला अंत नाही. वाहतुकीची साधने, मोबाईलचे युग आल्यामुळे प्रत्येक नात्यातले भावनिक अंतर वाढत चालल्याचे दिसते. या पार्श्वभूमीवर उपरोक्त ओवीचा आशय आपल्याला अंतर्मुख करतो. प्रचंड अभावग्रस्तेच्या काळातही तत्कालीन लोकांनी त्या त्या नात्यातले पावित्र्य, जिव्हाळा, प्रेम, माणुसकी जोपासलेली आढळते. हे लोकसंस्कृतीचे मौलिक संचित आहे हे आपल्याला मान्य करावे लागेल.

''वावर आडे वावर, कोनता वावरमा जाऊ,
भाऊना वावरमा, नाग डोले जसा गहू''
''आम्हे सात वं बहिनी, सात गावन्या चिड्या
एकुलता एक भाऊ, त्याना पिरीममा येड्या''

प्रस्तुत ओव्याही भावा-बहिणीचे प्रेम अधोरेखित करतात. त्यांच्या शेतातील समृद्धी, त्याच्याविषयीचे सातही बहिणींचे आत्यंतिक प्रेम या ओव्यांतून व्यक्त होते.

बहिणीच्या घरी मुलगी सून म्हणून पाठविणे ही प्रथा दलित म्हणजे पूर्वाश्रमीच्या महार जातीत आजही प्रचलित आहे. या सोयरीक संबंधामुळे काही कुटुंबामध्ये जवळीकता जर निर्माण झालेली असली तरी दुरावाही निर्माण झालेला आढळतो. भावाला व्याही म्हणून स्वीकारणे ही गोष्ट नातेसंबंध तुटण्यास





अनुक्रमणिका

कारणीभूत ठरते. बहीण आपल्या मुलीची सासू झाल्यानंतर तिला सासुरवास होणे परंपरेला धरून मानले जाते. त्यातून भावा-बहिणीच्या पूर्वीच्या नात्यामध्ये वितुष्ट निर्माण होताना आढळते. असा आशय खालील ओवीगीतांतून व्यक्त होतो :

''भाऊ कया याही, भासी कयी वहू,
ऱ्हायनात काया खडा, उडी ग्यात गहू''
''भाऊ कया याही, माय चाव्याले बोलाले,
भासी कयी वहू, माय आत्याबाई म्हनाले''
''भाऊले कया याही, भवजाई याहीन व्हयेना,
लगीन लागाना येये, मांडोमझार येयेना''
''आंबानी कयरी, आंबाले व्हयनी जड
भाऊना करता, भवजाई लागे गोड''
''भाऊ भाऊ करू, भाऊले नही मया,
वाकडी वाट करी, पोरना गावले गया''

भावाची मुलगी सून म्हणून स्वीकारल्याने सासू-सुनांमधला संघर्ष कमी होतो, अशा अपेक्षेने असे विवाहसंबंध जोडले जातात. परंतु रक्तसंबंधातले विवाह असले तरी भावा-बहिणीच्या नात्यामध्ये वितुष्ट हे निर्माण होतेच. उपरोक्त ओव्यांमधून भाऊ-भावजय-नणंद यांच्या नातेसंबंधावर प्रकाश पडतो. भाऊ-बहीण अविवाहित असताना त्यांच्या नात्यातले पावित्र्य त्यांच्या विवाहानंतर मात्र टिकत नाही, असेच म्हणावे लागेल. बहिणीच्या घरी मुलगी सून म्हणून पाठविल्यानंतर 'ऱ्हायनात काया खडा, उडी ग्यात गहू' असा अनुभव बहिणीला व भावालाही येतो. एकंदरीत दलित समाजातील स्त्रियांच्या ओवीगीतांतील भावा-बहिणीचे संबंध जवळीकतेचे असले तरी नात्यात परिवर्तन झाल्यानंतर दुरावा निर्माण होतो, हेही तेवढेच खरे! हे सत्य उपरोक्त ओव्यांमधून अगदी सहज प्रकट होते.

**साधन व्यक्ती/ओव्यांची प्राप्ती**

१) श्रीमती लक्ष्मीबाई अर्जुन भामरे, रा० कापडणे, ता० जि० धुळे

२) श्रीमती येसाबाई हिरचंद भामरे, रा० कापडणे, ता० जि० धुळे

■

28 अजिंठा, रघुवीरनगर, खोकाई माता रोड, नंदुरबार 425 412
भ्रमणभाष : 098222 94255



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# भाषेची मुळं लोकजीवनात!

विजया देव

आपली भाषा ही काही आपल्यापेक्षा कुणी वेगळी वस्तू नसते किंवा ती व्यवहाराचं निर्जीव साधन नसते. आपणच आपल्या जीवनातून तिला घडवत असतो. अनुभवाच्या बारीकसारीक अर्थछटा सुचवायला आपल्याला वेगवेगळे शब्द लागतात, आपल्या भोवतालची सर्व वस्तुजात त्यातल्या बारकाव्यांनिशी टिपण्यासाठी आपण नेमके शब्द शोधत असतो. उदाहरणार्थ, 'रवाळ', 'कणीदार', 'भरड', 'जाडसर' असे शब्द काही नुसत्या शब्द घडवणाऱ्या सोसातून निर्माण झालेले नसतात. त्या पदार्थांचा नेमका गुणधर्म, पोत, स्पर्श, दृश्यरूप असं सगळं विचारात घेऊन ते भाषेत येतात आणि तो अर्थ समजून ते वापरले तर कृतीचं सार्थक होतं. नाहीतर 'आणि अमुक मिक्सीवर बारीक करून घ्यावं.' या सूचनेतून काय बोध होणार?

पण काळाच्या रेट्याची आणि माहितीप्रपाताची सबब सांगून आपणच नेमकेपणाला, योग्य पर्याय शोधण्याला तिलांजली देऊन काम भागवत असतो. मग सुरू होतं भाषेचं सपाटीकरण. प्रसारमाध्यमांच्या भाषेत, वृत्तपत्रीय लेखनात तर असे सरधोपट, मोघमपणाने वापरलेले शब्द जागोजाग भेटत राहतात. शब्दांचा असा अनादर करणारा ढिसाळ वापर वाचकांच्या लक्षात येत नाही असं नाही, पण वाचकच समजूतदारपणाने 'म्हणजे लेखकाला असं म्हणायचं असावं' अशी सूट देऊन टाकतो. कारण वाचकालाही बरंच काही वाचायचा रेटा असतोच.

अलीकडेच एका वृत्तपत्रीय पुरवणीत असाच एक शब्द निरागसपणे चुकीच्या अर्थाने वापरलेला आढळला आणि भाषाअभ्यासक म्हणून या निमित्ताने मी लिहिती झाले.

लेख आहे पिस्त्यांची शिफारस करणारा (सेहत के वास्ते, खाओ पिस्ते, शुभदा रानडे, लोकसत्ता पुरवणी, गुरुवार १९ नोव्हेंबर २००९). लेख मराठीतला, त्याविषयीची माहिती इंग्रजीतून घेतलेली असावी आणि शीर्षक हिंदी! पण ते असो!

वजन घटवण्यासाठी आणि पोषक आहारमूल्यं मिळवण्यासाठी पिस्त्यांची बरीच शिफारस या लेखात केलेली आहे. त्यात पिस्त्यांची वर्गवारी 'सालं

काढलेले' आणि 'सालीसकट' अशी केलेली आहे. डॉ० पेंटर यांनी सालं काढलेल्या आणि सालींसकट अशा दोन्ही प्रकारच्या पिस्त्यांचा अभ्यास केला. 'सालींसकट पिस्ते खायला दिले की पिस्ते ४५% कमी खाल्ले जातात कारण सालं काढण्यात वेळ जातो. तेच सालांशिवाय पिस्ते दिले तर जास्त प्रमाणात पिस्ते खाल्ले जातात.' वगैरे वगैरे.

हे वाचून लक्षात आलं की लेखिकेला इथे 'साल' नसून 'टरफल' अभिप्रेत आहे. साल आणि टरफल ही दोन्ही आवरणं असली तरी त्या दोन्हींमध्ये खूप फरक आहे. हा फरक समजून न घेता लेखिकेनं 'टरफल' हा शब्द गावीही नसल्यासारखा सर्रास 'साल' या शब्दाचा उपयोग केला आहे. टरफल हा शब्द आणि त्याचा अर्थ उपयोग माहीत नसेल असे नाही, पण इंग्रजीतून घेतलेल्या माहितीचं मराठीकरण करताना शब्दांच्या निवडीबद्दल आळस केला गेला असावा. वास्तविक या लेखासोबत टरफलासहित पिस्त्यांचं ठळक चित्र आहे. साल म्हटलं काय, टरफल म्हटलं काय, लक्षात येतंय ना, असा दृष्टिकोन असला तरी पिस्त्याला अंगची सालही असतेच, आणि वर कठीण टरफल असतं. आपण टरफल काढून पिस्ते खातो, साल काढून नव्हे. वेगळे शब्द हे पदार्थाच्या भिन्न गुणधर्मासाठीच योजलेले असतात. साल हे फळांचं अंगचं आवरण असतं. उदा० चिकूची साल, केळ्याची साल. ती फळाच्या गरालगत मऊ, नरम असते. ती सोलून किंवा साल काढण्याच्या यंत्रानं काढता येते. कच्च्या बटाट्याची साल आपण यंत्रानं सोलतो, उकडलेल्या बटाट्याची साल सहज सुटते, बदामाला अंगची साल असते, बदाम भिजवले की ती सोलता येते. तशीच पिस्त्यालाही असते, पण त्यावर जे कठीण आवरण असतं ते त्याचं टरफल; साल नव्हे. भुईमुगाच्या शेंगांच्या टरफलांबद्दलची लोकमान्य टिळकांच्या विद्यार्थिदशेतील गोष्ट प्रसिद्धच आहे. शेंगांमधले दाणे काढून मुलांनी टरफलं वर्गात टाकली होती, ती काही भाजलेल्या दाण्यांची सालं नव्हती.

टरफलापेक्षा कठीण असेल ते कवच. बदामाचं कवच, ते फोडून निघते ती बदाम बी. पूजेत लागतात ते अख्खे बदाम, म्हणजे कवचासहित बदाम. नारळ, कवठ ही आणखी कठीण कवचांची फळं. सांल आपण सोलतो, टरफल आपण काढतो आणि कवच फोडावंच लागतं. नारळाला बिचाऱ्याला साल नसते. करवंटीपासून सुटलेली वाटी (ओल्या नारळाची किंवा सुक्या खोबऱ्याची) किसणीवर धरून किसली तर खाली पांढराशुभ्र कीस पडतो, आणि किसणीवर हातात राहते ती 'पाठ', साल नव्हे. या नारळाच्या नावांची गंमतही बघा. मानानं द्यायचं ते श्रीफल, पूजेसाठी असोला नारळ, पाणीवालं शहाळं, ओल्या खोबऱ्याचा

तो नारळ आणि करवंटीपासून सुटून गोटा झाला की सुकं खोबरं (आणि 'सुकं'च, 'वाळलेलं' नव्हे.)

आपल्या प्रदेशातलं हवामान, निसर्ग जे आपल्याला देतो, ज्या वनस्पती तिथे वाढतात त्या आपल्या आहाराचा भाग बनतात. ऋतुमान आणि पदार्थांचा गुणधर्म पाहून आपण त्यांचा आहारात वापर करतो, मग त्या गोष्टींना स्वतंत्र नाव देणं आलंच. नारळ हा एक प्रमुख घटक, म्हणून त्याच्या वेगवेगळ्या अवस्थांना वेगवेगळी नावं. पण ज्या हवामानात वाढणारं हे झाड नव्हे, तिथे त्या प्रदेशात तो आहाराचा भागही नव्हे. म्हणून त्या प्रदेशातल्या भाषेत नारळाला एवढी नावंही नाहीत. उदाहरणार्थ, उत्तरेत, हिंदीत ओल्या नारळाला, शहाळ्याला, सुक्या खोबऱ्याला वेगवेगळे शब्द नाहीतच. 'नारियल' या शब्दातच सगळं सामावतं. यापेक्षा वेगळी गंमत मल्याळी भाषेत दिसते. मल्याळममध्ये नारळाला 'नालिगेरम्' आणि शहाळ्याला 'एळनीर' म्हणतात. पण सुके खोबरे हा आहाराचा भाग नसल्यामुळे त्याला शब्द नाही. गरजच पडली तर 'कोपरा' म्हणून काम भागवलं जातं. पण तो मल्याळममधला शब्द नव्हे. या एकाच वस्तूची कालमानानुसार पक्व झालेली तीन वेगवेगळी रूपं आणि त्यासाठी वेगवेगळे शब्द, मला वाटतं, फक्त मराठीतच दिसतात.

फळ म्हटलं की त्यात बी आलीच. (बिनबियांची द्राक्षं आणि बिनबियांची पपई सोडून देऊ.) त्यांना सरसकट बिया म्हटलं जात असलं तरी काही फळं मात्र आपलं स्वत्व आणि सत्त्व वेगळं राखतात. चिकू, जांभूळ, पेरू यांच्या त्या बिया, पण आंब्याची मात्र बाठ किंवा कोय; फणसाची आठळी आणि चिंचेचा चिंचोका.

उसाला बिचाऱ्याला बीच नाही, त्याच्या पेराशी असतात 'डोळे'. तिथूनच तो रुजतो आणि उसाला खालीवर असतात शेंडे-बुडखे. एखाद्या गोष्टीला शेंडा बुडखा नसणं हा वाक्प्रचार त्या उसावरूनच आलेला आहे. उसाच्या तळाचा भाग तो बुडखा आणि वरचा तो शेंडा. हा आगापिछा ज्या गोष्टीला नाही तिच्यावर विश्वास कसा ठेवणार?

भाषेचा बुडखा, भाषेची मुळं तर परंपरेत, लोकजीवनात, संस्कृतीत खोलवर रुजलेली असतात. त्यांच्यातून सत्त्व घेऊनच मोकळ्या वातावरणात तिला नव्या आविष्काराचे नवे शेंडे, धुमारे, फुटत असतात, विस्तारत असतात. एवढ्यासाठीच भाषेकडे 'डोळस' दृष्टीनं पाहायला हवं. तरच भाषेची गोडी चाखता येईल.

■

सुप्रिया, 61/14 एरंडवणे, प्रभात रोड, 14वी गल्ली
इन्कमटॅक्स ऑफिसजवळ, पुणे 411 004
भ्रमणभाष : 094230 09522

# बदलणारी मराठी भाषा

अ०पां० देशपांडे

भाषा दर १० कोसांवर बदलते असे मानतात; तशी ती दर दहा वर्षांनीही बदलते हे का बरे मांडले जात नाही? काळ जसा प्रवाही आहे तशी भाषाही प्रवाही आहे. त्यामुळे जुने रीतीरिवाज, संस्कृती, शिक्षणपद्धती, परिमाणे इ० बदलतात तसतशी जुनी भाषा कालबाह्य होते आणि त्यात आता बदलत्या तंत्रज्ञानाचा झपाटा आला आहे. त्यामुळे ही भाषा बदलते आहे.

दर दहा कोसांवर भाषा बदलते हे वाक्य आजच्या तरुणांना समजतेच असे नाही. कारण कोस म्हणजे काय? दोन मैलांचा एक कोस होतो. पण आता अमेरिका सोडता इतरत्र मैलांचे किलोमीटर झाले. त्यामुळे कोस फारच दूर राहिला. मग आता १० कोसांचे रूपांतर करून भाषा दर ३२ कि०मी० वर बदलते असे म्हणायचे का? शिवाय मैल या एका संज्ञेवरून आपण त्याचा विविध प्रकारे वापर करत आलो त्याचे काय करणार? त्यास अजून तरी पर्याय आले नाहीत. उदा० मोटारगाडीत, आगगाडीत, विमानात वेग मोजण्यासाठी जे मीटर वापरतात त्याला मायलोमीटर म्हणतात. दर ताशी किती मैलांचे काहीही होवो हा मीटर मायलोमीटरच राहील? उदा० एकेकाळी मुंबई-पुणे डाक घोड्यावरून जाई. मुंबईहून सुटलेला घोडा बदलून दुसरा घोडा वापरला जाई. अशा जागेला त्या वेळी बदलापूर (कल्याण-कर्जत दरम्यान असलेले गाव, रेल्वेस्थानक इ०) म्हणत. आज डाक पाठवण्याचे मार्ग बदलले तरी गावाचे नाव बदलापूरच राहिले. तसे मैल गेले तरी मायलोमीटर हे नाव तसेच चालू ठेवावे का? मैलावरून वापरला जाणारा वाक्प्रचार म्हणजे माईलस्टोन हा आहे. अंतर दर्शविण्यासाठी रस्त्यावर मैलांचे दगड उर्फ माईलस्टोन असतात. आता मैल गेल्यावर ते मैलाचेच दगड राहणार का? शिवाय संस्थेच्या आयुष्यात, माणसाच्या आयुष्यात, विज्ञानाच्या इतिहासात काही महत्त्वाच्या घटना घडतात त्याला आपण मैलांचे दगड म्हणतो. उदा० चाकाचा शोध हा वैज्ञानिक क्रांतीतील मैलाचा दगड आहे असे मानतात. मी मैलो न मैल चालत गेलो (म्हणजे खूप लांबवर चालत गेलो) किंवा इंग्रजीत माइलेज असा शब्द व त्यावरून रुळलेला शब्दप्रयोगही आहे. उदा० एखाद्याला

एसएससीच्या यशामुळे खूप माइलेज मिळाले असे आपण म्हणतो.

फूट, इंच, यार्ड ही परिमाणे आपण मीटर, सेंटीमीटर, मिलीमीटरमध्ये बदलल्याने यांवरून पडलेली भाषा गेली. अगदी वसंत बापटांची इंच इंच लढवू छातीही गेली. इंग्रजीतील एक छान उद्धृत आठवले, 'दोज हू स्पीक इन यार्ड्स अँड मूव्ह इन इंचेस, बी टिन्टेड विथ फूट', 'ए, तू आता इथून फूट' हेही गेले.

दुसरी गोष्ट - फार पूर्वी छोट्या वजनांसाठी गुंजा, मासा वापरीत आणि तोळाही. (१६ गुंज = १ तोळा, ९६ तोळे = १ शेर (अंदाजे १ किलो). वैद्यलोक पूर्वी ही मापे औषधे देताना वापरत. त्यामुळे ती भाषा त्यांच्या तोंडात होती. त्यावरून एखाद्या रुग्णाची तब्येत खूप नाजूक झाली असेल तर त्याचे वर्णन अमूक एखाद्या रुग्णाची तब्येत तोळा-मासा झाली आहे, असे म्हणत. आता गुंज फक्त पाहायला मिळत असल्याने दारू प्यायलेल्या माणसाचे डोळे गुंजेसारखे लाल झाले असे म्हटले तर म्हणणाऱ्यालाच दारूबाज म्हणेल, तू काय म्हणतोस ते मला समजत नाही. तू काही गांजा-भांग घेतली आहेस का? पावशेर किंवा पाव किलो वा पाव लिटर, पाव म्हणजे एक चतुर्थांश राहिले पण पावावरून अदपाव (अर्धा पाव) आणि छटाक (पावचा पाव अथवा पावाचा एक चतुर्थांश) ही मापे गेली. पण पूर्वी दारू पिऊन आलेल्याला काय रे पावशेर मारून आला का म्हणत, तेही गेले.

१६ आणे = एक रुपया होता. त्यावरून डॉक्टर, वैद्य एखाद्याची तब्येत ५० टक्के बरी झाली म्हणायच्या ऐवजी आठ आणे सुधारली म्हणत. एखाद्याचे काम १०० टक्के झाले की १६ आणे काम फत्ते म्हणत. दुष्काळामुळे ७५ टक्के पीक गेले तर ४ आणे पीक वाचले म्हणत.

तंत्रज्ञानामुळे जुन्या गोष्टी संपून नव्या आल्या. जसे कार्बन पेपर जाऊन आता झेरॉक्स आले तेव्हा अमूक एक माणूस दुसऱ्यासारखाच आहे असे म्हणताना तो त्याची कार्बन कॉपी आहे असे आपण म्हणत असू. कॉपिंग पेन्सिल गेली. सायक्लोस्टाइलिंग गेले. टाइपरायटर कॉम्प्युटरवर चढला पण टाइपरायटरची ओळ संपत येताना घंटा वाजे ती घंटाही गेली. न०चिं० केळकरांची एकसष्टी साजरी झाली तेव्हा 'मी आता म्हातारा झालो' म्हणायच्याऐवजी 'मला आता टाईपरायटरची घंटा ऐकू येऊ लागली', असे ते म्हणाले होते.

तसेच ५०-१०० वर्षांपूर्वीचे साहित्य आणि त्यांचे लेखकही कालबाह्य झाले. एका मुलाच्या घरी त्याला पाहायला माणसे आली. मुलाचे वडील बाहेर गेले होते. दरम्यान काकांनी कारभार सांभाळला. मुलाचे वडील आल्यावर ते पाहुण्यांना



अनुक्रमणिका

म्हणाले, 'हाच मुलाचा बाप!' सर्व हसले. पण छोट्यांना मामा वरेरकरांचे या नावाचे नाटक होते हे काय माहीत?

अशी जुनी भाषा कालबाह्य होताना पोकळी राहत नाही. नवी भाषा, नवे तंत्रज्ञान, नवे रीतिरिवाज त्यात डोकावतात. उदा० आजची मुले तुझा फंडा क्लिअर नाही म्हणतात. उशिरा लक्षात येणाऱ्याला, त्याची ट्युबलाईट आता फकफकली म्हणतात.

प्रसिद्ध विचारवंत आणि लेखक डॉ० स०ह० देशपांडे यांच्या लिखाणात काही जुने शब्द आवर्जून येतात. एकदा मी त्यांना विचारलेसुद्धा की हे सध्या लोकांना न समजणारे शब्द तुम्ही का वापरता? तर ते म्हणाले, असे शब्द कुणीच वापरले नाहीत तर ते चलनातून निघून जातील.

याचा अर्थ भाषेसारखा मोठा विषय पण तो अगदी त्या-त्या भागापुरता, त्या-त्या काळापुरता, त्या-त्या जातीपुरता, त्या-त्या सांस्कृतिक आणि शैक्षणिक पातळीपुरता राहतो की शेवटी तो सांकेतिक ठरतो अशी शंका यावी.

■

**काशी विश्व हिंदू विश्वविद्यालयात मराठी**

काशी हिंदू विश्वविद्यालयात मराठीबरोबरच तमीळ, तेलगू, कन्नड, नेपाळी याही भाषा शिकविल्या जातात. या भाषांच्या विकासासाठी सुमारे दहा वर्षांपूर्वी तामिळनाडू, आंध्र व कर्नाटक सरकारांनी पाच-पाच लाख रुपयांची अनुदाने या विद्यापीठांना देऊन त्या रकमांच्या व्याजातून अध्यासन निर्माण करून प्रोफेसरचे पद व पीएच०डी० करण्यासाठी दोन विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीची सोय केली आहे. नेपाळी सरकार स्वखर्चाने एका लेक्चररची नियुक्ती करीत असते... साठ वर्षांपासून जेथे मराठीचे अध्यापन अव्याहतपणे होत आहे अशा काशी हिंदू विश्वविद्यालयामधील दृढमूल मराठी विभागाला आर्थिक आधार देण्याचे औचित्य व औदार्य महाराष्ट्र शासनाने का दाखवू नये?

डॉ० सुरेश भृगुवार, 'नवभारत', फेब्रुवारी २०१०. पृ० ३०-३१

# 'ण' की 'प' ?

मेघना सामंत

आमच्या मालवणी प्रकारच्या माशांच्या आमटीची कृती एका मित्राला सांगत असताना एक गंमत लक्षात आली. मी सांगत होते, ''वाटपात अमुक अमुक घालायचं... मग वाटप उकळायचं...'' तर तो अडवून म्हणाला, ''वाटप काय वाटप? वाटण म्हणायचंय ना तुला?'' एक क्षण मला गोंधळायला झालं. कारण आई-आजी सगळ्यांच्या तोंडी वाटप, वाटपाची तयारी, वाटपाची आमटी हेच शब्द ऐकलेले, मग वाटप हा शब्द चुकीचा कसा? तितक्यात हा मित्र म्हणतो कसा, ''वाटप म्हणजे बक्षीस वाटप किंवा वह्यावाटप, धान्यवाटप, खातेवाटप वगैरे आणि तुला म्हणायचंय ते वाटण.'' आमच्यात वाटपच म्हणतात असं मी ठासून सांगितलं खरं, पण मग थोडं विचारचक्र सुरू झालं. आमच्या भागात दळणाला सर्रास दळण म्हणतात. 'आमच्या येथे सर्व प्रकारच्या धान्याचे दळप व कांडप करून मिळेल' अशी पाटी मी कोल्हापुरात कुठेतरी बघितलेली आठवली. त्यावरून कांडपीण हा शब्द आठवला. कांडपिणींवरून रांधपिणी आठवल्या. म्हणजे रांधप हा शब्द असणारच. तसाच वाढप (आणि वाढपी) हे शब्द तर चांगलेच प्रचारात असलेले. उसाचा 'गाळप' हंगामही वाचलेला आहे. अशाच प्रकारचा आणखी एक शब्द म्हणजे वाजप. हा फक्त सिंधुदुर्ग भागात ऐकायला मिळेल. याला प्रमाण-भाषेत बहुधा प्रतिशब्द नसावा. लग्नात वगैरे - 'बहु गल्बला न करणे' अशी सूचना देऊनही वाजंत्री जो गल्बला करतच राहतात तो म्हणजे वाजप.

यावरून एक गोष्ट लक्षात आली की काही ठरावीक क्रियापदांची 'ण' ऐवजी 'प' लावून केलेली नामंच आमच्या बोलीत रुजली असावीत. क्रियापद (वाटणे) एकच असून, 'वाटप' म्हटलं की वितरण आणि 'वाटण' म्हटलं की ओल्या चटणीसारखी, अनेक पदार्थांची एकत्र वाटून केलेली गोळी असं पुण्यामुंबईकडच्या भाषेने ठरवलं असलं तरी आम्ही बुवा वाटप हा शब्द वापरणारच.

ता० क० नुकताच आणखी एक 'प'कारान्त शब्द सापडला - पाडप. हाही कोकणातलाच. माडांवरून नारळ उतरवायच्या कामाला पाडप म्हणतात.

■

सी-202, सॅटलाईट पार्क, गुंफा रोड, जोगेश्वरी पूर्व, मुंबई 400 060
ई-पत्ता : askwhy.meghana@gmail.com

# हिंदीचे अतिक्रमण आता मराठीच्या पाठ्यपुस्तकातही !

**अनिल शेळके**

आज इंग्रजीपेक्षा हिंदीचे मराठी भाषेवरील आक्रमण हा खरा कळीचा मुद्दा आहे. प्रसार माध्यमातून मराठी मुलांवर हिंदी शब्दांचा अव्याहत मारा चालू असतो. त्यामुळे हिंदी शब्दांचा चुकीचा अर्थ लावून मराठी मुले मराठी भाषा बोलत आहेत.

हा प्रभाव इतका आहे की, मूळ सार्थ मराठी शब्दच मुलांना ठाऊक नाहीत असे दिसून येते. आजच्या पिढीवर ओठावर डास, कासव, अतिरेकी या मराठी शब्दांऐवजी मच्छर, कछुआ, आतंकवादी हे शब्दच येतात. आता तर हे हिंदीचे भयावह अतिक्रमण मराठी विषयाच्या पाठ्यपुस्तकातही दिसू लागले आहे.

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाने ३१ जानेवारी २००९ रोजी इंग्रजी माध्यमांच्या शाळांमधील आठव्या इयत्तेसाठी प्रसिद्ध केलेल्या सुलभ भारती या मराठी विषयाच्या पाठ्यपुस्तकामध्ये 'विलक्षण पैज' ही केशव फडणीस यांची कथा समाविष्ट केली आहे.

या कथेत ''मी तुमच्या त्या लालजीकडून खाली हात परत फिरणार'' (पृष्ठ ५९). ''तुम्ही खाली हात परत आला तर मी तुम्हांला ५० सुवर्णमुद्रा देईन'' (पृष्ठ ६०), आणि ''मला जर खाली हात परत जावे लागले तर...'' असा तीन वेळा रिकाम्या हातांनी परत येणे या अर्थाने 'खाली हात'चा उल्लेख झालेला आहे.

■

राम, 3657 स्टेशन रोड, बार्शी, जि० सोलापूर 413 401
दूरभाष : (02184) 226301
भ्रमणभाष : 094201 33013

दखलयोग्य

# अरबी - मराठी

उज्ज्वला रेगे

सुरुवातीच्या दिवसांत एकदा मी बायकांच्या ओपीडीत एका पेशंटला तपासलं. त्यानंतर ती कपडे, अबाया चढवत होती. खुर्चीवर काढून ठेवलेल्या तिच्या काळ्या शेल्याकडे बोट दाखवून ती मला म्हणाली,

''आतोनी शेला. (दे मला शेला)''

मी दचकले. ही बेदू बाई मला समजावं म्हणून शेला शब्द वापरते आहे का? हिला कसा कळला मराठी शब्द? माझं गांगरणं तिच्या लक्षात आलं. पण तिला वाटलं की मला शेला या शब्दाचा अर्थ कळला नाही. समजावणीच्या सुरात तिने सांगितलं.

''त्या खुर्चीवर ते जे काळं कापड आहे ना माझं पांघरायचं, त्याला अरबीत शेला म्हणतात.''

पण तेव्हापासून मी कान टवकारले. तेव्हा ''दुकान, सैल, कंदील, मंदील'' हे शब्द रोजच्या संभाषणात सर्रास ऐकू आले. खद्रातली लहान मुलं आपल्या वडलांना आमच्या मुलांसारखीच, ''बाबाऽऽ'' अशीच हाक मारत हे लक्षात आलं. 'मरवा, ऊद, अत्तर' हे सुगंधी शब्द सापडले. 'व' या उभयान्वयी अव्ययाने तर अगदी 'हे' व 'ते' अशा थाटात खुद्रा व मुंबई जोडून टाकली.

राशीद अश्शम्मरीने रागारागाने मला 'तंबी' दिली. मी त्या तंबी शब्दावर खूश झाले म्हणून तो आणखीच रागावला. पण मग 'खुलासा' केल्यावर तो 'खजील' झाला. याखेरीज मला 'मुद्दत, फुरसत, हरकत' या मराठी शब्दांच्या त्याच अर्थाच्या 'मुद्दा, फुरसा, हरका' या चुलतबहिणी तोंडवळ्यावरून ओळखता आल्या. 'वार'भर कापडाचा 'हिसाब' आणि रोज 'रतलाचा रतीब' हे ऐकून तर मन आजोळी, बाळपणात जाऊन पोचलं. 'मनुका' खात खात मी 'कंसा'तला 'मजकूर' वाचला. मग 'इभ्रत, इलाखा, कपार, कनात, कयास, कसब, कायदा, कुवत, पुण्याच्या कसबा पेठेतला कसबा (= शहराचा जुना भाग), खंदक,' असे माहेरचे पाठीराखे जिथेतिथे भेटायला लागले.

उर्दू-हिंदीच्या मध्यस्थीशिवाय मराठीशी थेट ऋणानुबंध साधणाऱ्या अशा कित्येक फारसी शब्दांनी माझं स्वागत केलं. मग अरबी बोलायच्या प्रयत्नात जेव्हा

जेव्हा एखादा शब्द अडला तेव्हा तेव्हा मी मराठी शब्द दडपून दिला. आणि कित्येक ठिकाणी तो खपूनही गेला. अरबी ही माझ्या मायमराठीशी नातं जोडणारी, माझी मामी*च, मला त्या दूरच्या देशात नव्याने लाभली.

(*मावशी म्हटलं असतं. पण मराठी IndoEuropean आणि अरबी AfroAsiatic. त्यामुळे या दोन भाषा एका वंशातल्या नाहीत.)

'सोन्याच्या धुराचे ठसके', पृ० १११-११२

■

**लीळाचरित्राची भाषा**

(लीळाचरित्र) ग्रंथाचे पुनर्लेखन, मुसलमान महाराष्ट्रात स्थिरावल्यावर तीस-बत्तीस वर्षांनी होऊनही त्यात अपवाद म्हणून एक देखील पर्शोअरेबिक वंशाचा शब्द येत नाही. हे या भाषेचे सर्वात महत्त्वाचे ऐतिहासिक सत्य आहे. कथन साहित्याला आवश्यक अशा या गद्यात समाजातून आलेली भाषा आहे. तिच्यात निरनिराळ्या व्यावसायिकांच्या व्यवसायांमधून पडलेली शब्दसंपत्तीची भर आहे, बोलींचा सढळ, पात्रानुरूप वापर आहे. समाजाच्या निरनिराळ्या स्तरांवर वावरणाऱ्या व्यक्तींच्या औपचारिक, अनौपचारिक संभाषणांचे स्वाभाविक नमुने आहेत. केवळ संबोधनवाचक शब्द घेतले तरी या भाषेच्या सामाजिक अंगाचे वैशिष्ट्य लक्षात येते. कन्नडसारख्या शेजारी भाषेतून मिसळलेला शब्दसंग्रह, आज सामाजिक संदर्भ लुप्त झाल्यामुळे भाषेतून निघून गेलेले, काही पूर्णपणे दुर्बोध वाटणारे असे अनेक शब्द या ग्रंथात आढळतात. वाक्संप्रदाय, म्हणी, लोकोक्ती आणि चक्रधरांच्या वाणीतून सहज बाहेर पडलेली 'अनावर मऱ्हाठी' वचने यांनी समृद्ध (अशी ही भाषा आहे.)

सुमन बेलवलकर, 'लीळाचरित्रातील समाजदर्शन' पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. पृ० ३३-३४

# प्रादेशिक भाषांना न्यायालयीन भाषा म्हणून मान्यता द्या - सर्वोच्च न्यायालयात याचिका

## (जे० वेंकटेशन. 'द हिंदू' २४ जून २०१०)

ज्याप्रमाणे लोकसभेत तात्काळ भाषांतर ऐकू येण्याच्या व्यवस्थेमुळे तमीळ व इतर प्रादेशिक भाषा वापरता येतात त्याप्रमाणे उच्च व सर्वोच्च न्यायालयांतही प्रादेशिक भाषांचा वापर करणे शक्य आहे का ह्याचा अभ्यास करण्याचा आदेश केंद्र सरकारला देण्यात यावा अशी विनंती करणारी याचिका सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आली आहे. ऑल इंडिया ज्यूनियर ॲडव्होकेटस असोशिएशनने ही याचिका केली असून न्यायालयीन भाषा म्हणून तमीळला मान्यता मिळावी अशी मागणी करणाऱ्या तामिळनाडूतील वकिलांना न्याय देण्याचा आदेश केंद्र सरकारला द्यावा अशीही विनंती याचिकेत करण्यात आली आहे. ही सार्वजनिक हित याचिका दाखल करणारे असोशिएशनचे अध्यक्ष एन्० राजा म्हणाले की घटना-कलम ३४८अन्वये प्रादेशिक भाषेला उच्च न्यायालयीन भाषा म्हणून राष्ट्राध्यक्षांच्या संमतीने मान्यता देण्याचा अधिकार राज्यपालांना आहे. आजही चार उच्च न्यायालयांमध्ये हिंदी ही (प्रादेशिक) भाषा न्यायालयीन भाषा म्हणून वापरली जात आहे. उच्च न्यायालयात तमीळमध्ये युक्तिवाद करण्याची मुभा नसल्याने असोशिएशनच्या सभासदांचा वकिली करण्याचा हक्क नाकारला जात आहे. तमीळला न्यायालयीन भाषा म्हणून मान्यता देण्याचा तामिळनाडू सरकारचा प्रस्ताव केंद्राच्या गृह मंत्रालयाकडे प्रलंबित आहे. विधिशाखेच्या विद्यार्थ्यांना पदवी परीक्षेत प्रादेशिक भाषेत उत्तरे लिहिण्याची मुभा बार कौन्सिलने दिली आहे. अशा परिस्थितीत उच्च न्यायालयातील युक्तिवाद प्रादेशिक भांषात करू न देण्याने त्यांच्या मूलभूत हक्कावरच गदा येते.

लोकसभेत आणि विविध आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये सहभागी होणाऱ्यांना आणि ते कामकाज पाहाणाऱ्यांना कामकाजाच्या माहितीचे तात्काळ इंग्रजीत भाषांतर ऐकायला मिळण्याची सुविधा अलीकडे सभागृहांत उपलब्ध असते हे सर्वज्ञात आहे, असे याचिका म्हणते. तशीच व्यवस्था उच्च आणि सर्वोच्च न्यायालयांतही करता येईल, असे याचिकेत म्हटले असून तशा आदेशाची विनंती करण्यात आली आहे. प्रादेशिक भाषांचा न्यायालयीन भाषा म्हणून उपयोग करता येणार नसेल तर विधिपरीक्षासुद्धा केवळ इंग्रजीत किंवा हिंदीत घेण्यास बार कौन्सिलला सांगण्यात यावे असे याचिकाकर्त्यांचे म्हणणे आहे. ■

# बोलींचा अभ्यास

विश्वनाथ खैरे

(**परीक्षित पुस्तक : बोली : समाज, साहित्य आणि संस्कृती** डॉ० कैलास सार्वेकर : प्रतिभास प्रकाशन, परभणी २०१०, पृष्ठे ७ + १६० किंमत : रु० १६०/-)

विविध विद्यापीठांतल्या मराठीच्या अभ्यासक्रमांमध्ये भाषा म्हणून भाषेच्या अभ्यासाला (साहित्य-समीक्षांच्या तुलनेने) खूपच कमी स्थान आहे. जे आहे त्याच्यावर एकोणिसाव्या शतकापासून चालत आलेल्या भारतयुरोपीय ऐतिहासिक प्रणालींचा पगडा आहे. विद्यापीठांमध्ये संशोधनाच्या अंगावर फारसा भर नाही. त्यामुळे भाषाविषयाचे दुपदवीधरसुद्धा नंतरच्या काळात भाषासंशोधनाकडे विशेष वळत नाहीत. जे वळतात ते त्यांच्या आवडीने किंवा त्यांच्या मायबोलीच्या प्रेमाने. त्यांच्या अभ्यासावर किंवा संशोधनावर साहजिकपणेच विद्यापीठातील अभ्यासक्रमाचे परिणाम दिसून येतात. बोलींच्या अभ्यासात सामाजिक आणि मानसिक घटकही काम करतात. असे असले तरी शिक्षणाच्या प्रसारामुळे ग्रामीण आणि दुर्गम भागातलेही काही अभ्यासक बोलींच्या अभ्यासाकडे वळत आहेत, त्यांच्या अभ्यासू लेखनाची बूज ठेवली पाहिजे आणि आधी सांगितलेल्या प्रभावांची वजावट करून निखळ शास्त्रीय अभ्यासाकडे त्यांना वळवण्यासाठी भाषाविषयक संस्थांनी आणि विद्यापीठांनीही खास प्रयत्न केले पाहिजेत. प्रस्तुत पुस्तकाकडे मुख्यत: या दृष्टीने या लेखात पाहायचे आहे.

पुस्तकाचे लेखक डॉ० कैलास सार्वेकर जळगावच्या उत्तर महाराष्ट्र विद्यापीठात मराठीचे प्रपाठक आहेत. त्यांनी ग्रामीण कविता या विषयावर पीएचडी केली आहे. ते पंचवीस वर्षे नवापुरच्या आदिवासी शिक्षणसंस्थेच्या महाविद्यालयात मराठीचे अध्यापक होते. तेव्हा त्यांनी आदिवासी विद्यार्थ्यांना मराठी भाषा शिक्षणाची गोडी लावण्यासाठी खास प्रयत्न आणि प्रयोग केले. गेल्या सुमारे वीस वर्षांत त्यांनी वेळोवेळी लिहिलेले लेख या पुस्तकात संग्रहित केले आहेत. त्यांत नामे, नातेसंबंधाचे शब्द इत्यादी तीनचार लेखरे (लहान लेख) आहेत. बहिणाईंच्या कवितेची बोली लेवा आहे या आशयाचा एक लेख आहे. एक लेख खानदेशातील लोकवाङ्मय आणि ग्रामीण कविता यांचे अनुबंध दाखवणारा आहे.

या सर्वांपेक्षा भाषाभ्यासाशी थेट आणि अधिक संबंध असलेले लेख बोलींवरचे आहेत. ''भाषा : इतिहास आणि भूगोल'' (कालेलकर १९८५) यातल्या विवेचनाचा आधार या लेखांमधल्या अभ्यासाला आहे. सार्वेकरांची मायबोली जामनेरी आहे. इतर बोलींचा अभ्यास त्यांनी मराठीचे अध्यापक असताना केला. खानदेशातील पावरा, कोंकणी आणि जामनेरी या बोलींची ओळख करून देणारे तीन लेख पुस्तकात आहेत. गुजराती आणि अहिराणी या 'भाषाभगिनी'ची तुलना करणारा एक लेख आहे. आदिवासी या नावात मावची, वसाव, कोंकणी, पावरा या चार बोलींचा समावेश आहे. या आदिवासी बोलींमधील म्हणी आणि गीते यांवर दोन लेख आहेत. 'आदिवासी विद्यार्थ्यांमधील भाषिक न्यूनगंड' घालवण्यासाठी केलेल्या उपायांची माहिती आणि विद्यार्थ्यांच्या त्यावरच्या प्रतिक्रिया यांचे दोन लेख आहेत. त्यांतल्या काही विद्यार्थ्यांनी शब्दजातींसह नोंदलेला आदिवासी बोलींमधला शब्दसंग्रह वर्गवारीने तक्त्यांमध्ये दिला आहे.

महाराष्ट्रात मराठी भाषा चालते आणि निरनिराळ्या बोलींचाही वापर लहानमोठ्या क्षेत्रांवर होत असतो. त्यांतल्या एखाद्या बोलीचा अभ्यास (१) मराठीची पोटभाषा म्हणून (२) मराठीला लागून असलेल्या भाषा आणि मराठी यांचा तिच्यावरील परिणाम शोधण्यासाठी (३) सध्याच्या प्रमाण-मराठीहून तिचे वेगळेपण दाखवण्यासाठी (४) त्या बोलीचे निव्वळ वर्णन करण्यासाठी - असा विविध प्रकारांनी होऊ शकतो.

पहिल्या प्रकारात ती बोली मराठी भाषेतून ध्वनिबदलाने काळाच्या ओघात सध्याच्या अवस्थेला आल्याचे धरले जाते. भाषाभ्यासातल्या भारतयुरोपीय प्रणालीचे हे गृहीतच होते. या प्रकारात लेखी मराठीतल्या लिपिबद्ध ध्वनींशी बोलीतल्या उच्चारणांची तुलना सार्वेकरांच्या बोलीविषयक लेखांमध्ये आली आहे. कालेलकरांनीच म्हटल्याप्रमाणे भाषा ही अनेक बोलींच्या संमीलनातून सिद्ध होते. भारतीय भाषासंभाराच्या बाबतीत ''लेखी ती भाषा आणि मुखी ती बोली'' अशी व्याख्या करता येईल. लेखी भाषेतून मुखी बोली निर्माण होत नाहीत हे मान्य केले तर प्रमाण मराठीतील अक्षरोच्चारणाला मानदंड मानण्याचे कारण नाही. बोलांचा अर्थ कळण्यासाठी लेखीतले शब्द अर्थातच वापरावे लागतील.

बोली-अभ्यासाचा दुसरा प्रकार म्हणता येईल अशी अहिराणी आणि दक्षिण-गुजराती या बोलींची एकाच कुळातल्या 'भाषाभगिनी' म्हणून तुलना केली आहे. कळत-नकळत अहिराणीला 'भाषा' पदवीला पोचवले आहे. यामागे प्रस्थापित भाषाकुलांच्या संकल्पनेचा प्रभाव आहे. सिंधुसंस्कृतीचे लोक इ०स० पूर्व १९व्या शतकापासून खानदेशात आले याचा आधार परस्परप्रभावासाठी दिला आहे. त्याने

भारतीय भाषाकुलाच्या संकल्पनेला छेद मिळतो. सयाजीरावांच्या मराठीसंबंधातील कार्याचा उल्लेख केला आहे त्याचा अहिराणी-गुजराती यांच्या तुलनेत साक्षात संबंध नाही. बोलीविषयक लेखात इतिहास, संस्कृती इत्यादी अनेक बाबींना स्पर्श करणे टाळले पाहिजे. तसेच 'वरील विवेचनावरून अहिराणीने मराठीकडून जशा काही गोष्टी घेतल्या तशा गुजरातीकडूनही घेतल्या. किंबहुना गुजरातीकडून अधिक घेतल्या असे म्हणता येईल' (पृ०३५) यांसारखी अतिव्याप्त विधाने करणे इष्ट नाही.

जामनेरी बोलीवरील लेखाच्या प्रास्ताविकात ही बोली 'आपले काहीएक वेगळेपण आणि स्वतंत्र अस्तित्व' टिकवून आहे असे म्हटले आहे. मुखपृष्ठावरील तक्त्यात मात्र जामनेर लेवा बोलीचा एक मुलूख म्हणून दाखवला आहे. प्रमाण मराठीतील औतचा जामनेरी उच्चार आउत होतो याला 'संयुक्त स्वरांची संधी' म्हटले आहे. 'कृषिजीवनाशी संबंध सांगणाऱ्या अनंत म्हणी या बोलीत आहेत' हे अतिशयोक्त विधान आहे. अशा गफलती लेखात आहेत. मायबोलीचा अभिमान हे एक त्याचे कारण संभवते. बोलींना भाषेहून अशुद्ध किंवा खालच्या पायरीवरच्या मानण्याची शिष्टजनांची प्रवृत्ती जशी कमी होत जाईल तशी बोली अभ्यासकांनाही बोलींच्या स्तुतिपर लिहिण्याची गरज वाटणार नाही.

बोलीचे निवळ वर्णन करण्याच्या चौथ्या प्रकारचे उदाहरण 'परिशिष्ट ब - खानदेशी बोलींमधील तुलनात्मक शब्दसंग्रह' या तक्त्यांमध्ये आहे. हे तक्ते सार्वेकरांच्या तेगा पावरा आणि भाईदास बागुल या तृ०व० कला वर्गातल्या विद्यार्थ्यांनी बनवले आहेत. वस्तू, शेती, धान्ये, भाज्या, फळे, नातेसंबंध इत्यादींचे सहा बोलींमधले शब्द त्यांत आहेत. घर - गूँ पोंगो, दरवाजा - बाणों बाणों जुपू, माठ - वेंडलो वेंडलो, मका - डोडा डोडा डुडा, भुईमुग - हिंड्यो हिंग्या मुंग्या, आई - आयो याहकी, वडील - आबो बाहाको बाबा, भाऊ - बाहा पावुहू, लवकर - माहारी माहारी उतवाल, ही सहज टिपलेली या बोलीतली खास उदाहरणे. बोलींनी स्वतंत्रपणे निर्माण केलेल्या शब्दांची उदाहरणे यांत दिसतात. या याद्या मर्यादित शब्दसंख्येच्या आहेत. पण त्या बोलीच्या जाणकारांनी नोंदल्या आहेत, तशाच मोठ्या प्रमाणावर मायबोली-अभ्यासकांनी नोंदल्या तर त्या त्या बोलीची विश्वसनीय नोंद आपल्याला मिळू शकेल. बोलीचे मूळ रूप, तिचे प्राचीनत्व, तिच्यावर झालेले इतर भाषा-बोलींचे परिणाम इत्यादी अभ्यास ही पुढची पायरी असेल. त्यांचा खुटपुट समावेश वर्णनात्मक नोंदीमध्ये करण्याची गरज नाही.

बोलींच्या नोंदी हा पदवीधरांच्या कामाचा भाग झाला. बोलीच्या परिसरातून प्रमाणभाषेच्या पदवीपर्यंत पोचण्यात बोलीकांना न्यूनगंडासारखे मानसिक अडथळे

पार करावे लागतात. सार्वेकरांनी त्या (महाविद्यालयीन) विद्यार्थ्यांचा न्यूनगंड घालवण्यासाठी प्रयत्न केले. दहा वर्षे मराठी शाळेत शिकूनही त्यांची क्षमता पुरेशी वाढली नव्हती यावरून माध्यमिक पातळीपर्यंतच्या त्यांच्या शिक्षणाची दशा लक्षात येते. त्या विद्यार्थ्यांच्या प्रतिक्रियांवरून असे दिसते की भाषेच्या लेखीपणाचाच धसका बोलीकांना जास्त बसतो. पहिली-दुसरीत बोलीतून शिकवून बोलीतल्या शब्द-वाक्यांच्या लेखी रूपांनी लिपीची ओळख करून दिली तर हा धसका कमी होईल का याचा विचार आणि प्रयोगात्मक आचार झाला पाहिजे. या न्यूनगंडातून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांनी बोलींचे शब्दसंग्रह करण्याचे कामही केले आहे. अशा विद्यार्थ्यांशी विद्यापीठातील शिक्षकांचा संपर्क राहावा आणि त्यांनी बोलींच्या अभ्यासात अधिक कामगिरी करावी यासाठी विशेष प्रयत्न व्हायला हवेत. एका लेखात आदिवासी बोलींतल्या म्हणी नोंदल्या आहेत. मार्गदर्शन लाभले तर बोलीक विद्यार्थी त्या म्हणींचा खोल अभ्यास करून बोलीकांचा इतिहास समजण्याला सामग्री देऊ शकतील.

भारतीय भाषा बोलींबाबतचे नोंदीचे किंवा अभ्यासाचे कार्य भारतीय भाषक-बोलीकांनी करणे उचित आणि गरजेचे आहे. विदेशी अभ्यासकांनी इंग्रजीत नोंदलेले अभ्यास प्रमाण मानून त्यांचे संदर्भ भारतीयांनी देण्याचा प्रकार थांबायला हवा. उच्चार नेमके टिपणे, संस्कृतिविषयक अनुबंध समजून घेणे भारतीयांनाच चांगल्या प्रकारे करता येईल. मराठी मुलखातल्या बोलींच्या नोंदी त्या मायबोलीच्या अभ्यासकांनी कराव्या यासाठी विद्यापीठे आणि संशोधनसंस्था यांनी पद्धतशीर प्रयत्न केले पाहिजेत. परिषदा आणि कार्यशाळा वगैरे घेऊन या अभ्यासकांना कामाच्या पद्धती समजावून दिल्या पाहिजेत आणि नोंदी संकलित करणारी यंत्रणा सिद्ध केली पाहिजे.

या पुस्तकावर लिहावे म्हणून संपादकांनी ते माझ्याकडे पाठवले. ते वाचून झाल्यावर पुस्तकात दिलेल्या चलफोनवर मी सार्वेकरांशी सविस्तर बोललो. (संपर्काच्या आधुनिक सोयी!) उत्तर महाराष्ट्र विद्यापीठातील मराठीच्या अभ्यासक्रमात बोलींच्या अभ्यासाला महत्त्वाचे स्थान देण्यासाठी त्यांच्या पदावरून ते प्रयत्न करू शकतात असे त्यांच्याकडून कळले. तो त्यांनी करावा, मायबोलींच्या शास्त्रशुद्ध अभ्यासाला अधिकाधिक विद्यार्थ्यांना मार्गदर्शन आणि उत्तेजन द्यावे आणि लेखनाच्या बाबतीतही या पुस्तकावर थांबू नये.

■

374 सिंध सोसायटी, औंध, पुणे 411 007
दूरभाष : (020) 2585 1187



अनुक्रमणिका

# 'म्हणून'ची चूक

**शकुंतला क्षीरसागर**

उज्ज्वला जोगळेकर यांनी 'उच्चारणातून व्यक्त होणारे संयुक्त तर्कसूचक अव्ययांचे 'अर्थ'कारण' (भाषा आणि जीवन वर्ष २८ अंक १ हिवाळा २०१०) या लेखात 'म्हणून', 'म्हणून तर', 'म्हणून तरी', 'काही' या उभयान्वयी अव्ययांच्या उपयोगाची अनेक उदाहरणे दिली आहेत. हा लेख त्यांच्या व्यासंगाची साक्ष पटवतो.

श्री०के० क्षीरसागर यांनी 'म्हणून'च्या चुकीच्या उपयोगाचे एक उदाहरण दिले आहे. ते वाक्य असे आहे, ''त्या काळी विद्यालये नव्हती; ते म्हणून पदवी घेऊ शकले नाहीत.'' या वाक्यातील चूक दाखवताना त्यांनी म्हटले आहे की, 'विद्यालय' ऐवजी 'विद्यापीठ' हवे; 'ते म्हणून' या ऐवजी 'म्हणून ते' असे हवे. 'ते म्हणून'चा अर्थ, त्यांच्याऐवजी दुसरा कोणी असता तर अन्य प्रकार घडला असता, असा होतो. हल्ली हा चुकीचा प्रयोग मुंबईच्या काही गटांनी जोराने चालू केला आहे. यात फक्त 'ही देअरफर' (He therefore) या इंग्रजी वळणाचे अनुकरण आहे.''

संदर्भ : क्षीरसागर, श्री०के० २००० **मराठी भाषा : वाढ आणि बिघाड,** राज्य मराठी विकास संस्था, मुंबई. (मूळ लेख 'आजची मराठी भाषा : वाढ आणि बिघाड' या नावाने मनोरा, सप्टेंबर १९७४, पृ० १५-१६ मध्ये प्रकाशित)

■

21/418 लोकमान्यनगर, पुणे 411 030





अनुक्रमणिका

# वर्ण आणि अक्षर

**दिवाकर मोहनी**

संदर्भ : 'शासनसंमत मराठी वर्णमाला', 'भाषा आणि जीवन' : वर्ष २८ अंक १ व २

प्रा० अर्जुनवाडकर ह्यांचा मुद्दा विचारणीय आहे. आपण उच्चार करताना बुद्धा, विठ्ठल, सक्खा असाच करीत असतो. पण... आणि हा पण फार महत्त्वाचा आहे; आपण नेहमी जसा उच्चार करतो तसे लिहीत नाही आणि आपण पूर्वीपासून जसे लिहीत आलो तसेच पुढेही लिहीत राहिल्याने आपले वाचन सुकर होत असते.

दुसरा मुद्दा असा की, आपल्या बोलीभाषा आणि संस्कृत ह्यांचे उच्चारच वेगवेगळे आहेत. आपल्या बोलीमध्ये म्हणजे देशज शब्दांमध्ये एकाच व्यंजनाचे द्वित्व करण्याचा प्रघात आहे. गप्पा, अप्पा, अण्णा, घट्ट, हट्ट, कच्चा, पक्का, हल्ला, किल्ला, पत्ता, गुत्ता, बत्ता असे उच्चार आम्हांला सहजपणे करता येतात. स्वास्थ्य, निःस्पृहत्व, धृष्टद्युम्न असे शब्द आम्हांला प्रयत्नाने उच्चारावे लागतात.

एकाच व्यंजनाचे द्वित्व करावयाचे हे आमच्या मनात अगदी पक्के ठसले असल्यामुळे आम्ही महाप्राण व्यंजनांचेसुद्धा लेखनात द्वित्व करतो. तसा उच्चार करणे प्रायः अशक्य असले तरी! वाचनसौकर्यासाठी हा लेखनदोष स्वीकारणे आवश्यक आहे असे मला वाटते.

प्रा० अशोक केळकर ह्यांनी सुचविलेल्या रु, रू लाही तेवढ्याचसाठी माझा आक्षेप आहे. ज्या अक्षरांची आपल्या डोळ्यांना सवय झाली आहे ती मोडू नये ही एक गोष्ट आणि जुनी पुस्तकेही लोकांच्या वाचनात येत राहणार असल्यामुळे ह्या दोन प्रकारच्या अक्षरांचा डोळ्यांना त्रास होईल ही दुसरी. म्हणून लेखनात फरक करण्याऐवजी अक्षरांतील ऱ्हस्वत्वाच्या खुणा डावीकडे वळतात आणि दीर्घत्वाच्या उजवीकडे (रु, रू) हे वाचकाला एकदा नीट समाजवून देणे इष्ट असे माझे मत आहे. (बघा : मि मी, मु मू)

डॉ० केळकर ह्यांच्या पत्रात अर्धचन्द्र हा शब्द एकदा आला आहे; अर्धचन्द्र ह्या शब्दाला निराळा संदर्भ आहे. त्यांना तेथे 'चन्द्र' अपेक्षित आहे हे उघड आहे. कारण चन्द्र ह्या शब्दाने पौर्णिमेचा पूर्ण चन्द्र सूचित होत नाही. चन्द्राची चतुर्थीची किंवा पंचमीची कलाच सूचित होते. ( ˘ )



अनुक्रमणिका

केवल-व्यंजनांच्या मालेला वर्णमाला म्हणणे आणि सस्वर-व्यंजनांच्या मालेला अक्षर-माला म्हणणेही चुकीचे आहे. आपल्या नागरी लिपीत ज्याचा उच्चार होऊ शकत नाही असे काहीही लिहिता येत नाही. केवल व्यंजनांचा उच्चार कोणालाही करता येत नाही. उत्, ऋक्, धिक्, वत्, विद् ह्या शब्दांतील व्यंजने मागच्या स्वराच्या आधाराने उच्चारली गेली आहेत. त्यांच्यापुढे स्वर आल्याबरोबर ती व्यंजने पुढच्या स्वराला जाऊन चिकटतात. उन्नयन, ऋक्साम, विद्वान्, सदसद्विवेक अशी त्यांची शेकडो उदाहरणे आहेत. एवढ्याचसाठी वर्णमाला क् ख् ग् घ् ङ् अशी कधीही लिहू नये. ती क ख ग घ ङ अशीच लिहावी. वाटल्यास उच्चारसौकर्यासाठी ती तशी लिहिली आहे असे सांगावे.

वर्ण हा अर्थशून्य असतो तर अक्षर हे अर्थपूर्ण असते. त्याचप्रमाणे 'वर्ण' हा समूहाचा एक घटक असतो. ख, भू ही वाक्यात वापरली तर 'अक्षरे' - क ख ग घ, भ भा भि भी भु भू हे वर्ण - हे जाणून जुन्या संज्ञा बदलू नयेत. मंत्र, वृत्ते ही सारी अक्षरसंख्येने ओळखली जातात, वर्णसंख्येने नाही!

■

गौरीवंदन, 123, शिवाजीनगर, नागपूर 440 010
भ्रमणभाष : 098819 00608

अहो, जगात अशी एकच कला आहे की, जी इंद्रियाने आस्वादायची नसते, मनाने आस्वादायची असते. संगीत, नृत्य, शिल्प, चित्र या इंद्रियगोचर कला आहेत. साहित्यकला ही अशी एकुलती एक कला आहे की जी मानसगोचर कला आहे... साहित्याचा रसिक केवळ आस्वादक नसतो, तर कवीची कविता आपल्या मनात मुरवून तो तिची नवनिर्मिती करीत असतो .... आस्वादासाठी हवे असते आर्ष, म्हणजे अनघड मन.... नवनिर्मितीसाठी हवे असते सुघड मन.

डॉ० द०भि० कुलकर्णी
अध्यक्षीय भाषण, ८३ वे अ०भा०म० साहित्यसंमेलन



अनुक्रमणिका







# अठरा विश्वे

**शं० दे० पसारकर**

'अठरा विश्वे' या शब्दप्रयोगाविषयी डॉ० ब्रह्मानंद देशपांडे यांचा लेख (भाषा आणि जीवन, पावसाळा २००९), आणि त्यावरील श्री०न० गुत्तीकर (हिवाळा २०१०) व विजय पाध्ये (उन्हाळा २०१०) यांच्या प्रतिक्रिया वाचल्या. याविषयीची जुनीच माहिती या ठिकाणी जिज्ञासू वाचकांसाठी नव्याने देत आहे.

'इसा' म्हणजे वीस वीस या संख्येचे गट (जोशी प्र०न० १९८२ : आदर्श मराठी शब्दकोश. विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे ६७). या शब्दाचे कृत्रिम संस्कृतीकरण म्हणजे 'विश्व'. 'गुंडम राउळ' यांना 'गोविंदप्रभू' किंवा 'अक्कलकोट' या गावाला 'प्रज्ञापूर' संबोधणे, अशापैकीच हा प्रकार. 'अठरा विसा' याचा अर्थ १८ × २० = ३६० दिवस, असा होतो. ३६० दिवस म्हणजे एक वर्ष. वर्षाचे सर्व दिवस, सदासर्वकाळ दारिद्र्य घरात वसतीला असणे, यालाच 'अठरा विश्वे दारिद्र्य' म्हणतात (हणमंते, श्री०शा० १९८० : संख्या-संकेत कोश. प्रसाद प्रकाशन, पुणे)

डॉ० नरेंद्र जाधव आपल्या आईविषयी सांगतात, ''मातोसरींचा पैशांचा हिशोब हा स्वतंत्र संशोधनाचा विषय आहे. खरे म्हणजे तिला विसाच्या पुढे मोजता येत नाही. शंभर म्हणजे पाच 'इसा' असे तिचे गणित असते'' (जाधव नरेंद्र २००७ : आमचा बाप आन् आम्ही, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई ४६).

मी माझ्या बालपणी विदर्भातील माझ्या खेडेगावात 'एक इसा, दोन इसा, तीन इसा' अशा पद्धतीने नाण्यांचे ढीग करून पैसे मोजणारी माणसे पाहिली आहेत.

■

'उषास्वप्न'
126 ब, मार्कंडेय नगर, सोलापूर 413 003
दूरभाष : (0217)260 2301
भ्रमणभाष : 094207 80570

# अठरा विश्वे

शकुन्तला फडणीस

अठरा विश्वे याबद्दल श्री० विजय पाध्ये यांचे टिपण वाचले. ('भाषा आणि जीवन' - उन्हाळा, पृ० ७४) मी भाषाशास्त्राची अभ्यासक नाही. तरीही अठरा विश्वेचा आणखी एक अर्थ सांगावासा वाटतो.

श्री० शं०ना० नवरे यांना 'गदिमा पुरस्कार' मिळाला त्यावेळच्या भाषणात शं०ना० म्हणाले होते - ''शब्द वापरताना नेमका अर्थ माहीत असला पाहिजे. 'अठरा विश्वे दारिद्र्य' हे शब्द वापरताना अठरा विश्वे कोणती याची माहिती घेण्याचा प्रयत्न केला. त्यातून अठरा विसावे म्हणजे १८ गुणिले २० म्हणजे वर्षातील ३६० दिवस असलेले दारिद्र्य हा अर्थ सापडला. प्रत्येक शब्दाची ओळख व्हावी असे मला वाटते. शब्दकोश पाहतो.''

शं०नां०चे वरील विवरण 'मेहता मराठी ग्रंथजगत', जाने० २००९ या अंकात पृ०८९ वर प्रकाशित झाले आहे. अठरा विश्वे हे दोन शब्द नेहमी दारिद्र्य या शब्दाला चिकटून येतात इतकेच मला माहीत आहे.

■

1233, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, रस्ता क्र० ४, पुणे 411 002
दूरभाष : (020) 2447 2232

---

## साभार पोच

संमेलनांच्या मांडवाखालून - कौतिकराव ठाले पाटील. कैलाश पब्लिकेशन्स, औरंगाबाद. पृ० १७३, किं० रु० १६०/-

अक्षरयात्रा - संपा० डॉ० दादा गोरे. अखिल भारतीय साहित्य महामंडळ. औरंगाबाद. पृ० १५०, किं० रु० १६०/-

मुक्त शब्द : मे २०१० - संपा० व प्रकाशक - येशू पाटील. मुंबई. पृ० ६८, वार्षिक वर्गणी रु० ३९०/-

काव्याग्रह : एप्रिल २०१० - संपा० विष्णू जोशी. वार्षिक वर्गणी रु० २००/-

शंका ...

# तिन्ही सांजा

सुशान्त शंकर देवळेकर

कविवर्य भा०रा० तांबे ह्यांच्या एका कवितेत 'तिन्ही सांजा' असा शब्दप्रयोग आढळतो : ''तिन्ही सांजा सखे मिळाल्या/देई वचन तुला...'' ह्यात 'तिन्ही सांजा' म्हणजे काय? एरवी आपण 'सांज झाली' असे म्हणतो; 'सांजा झाल्या' असे म्हणत नाही. 'तिन्हीसांजेची वेळ झाली' असे म्हणतो; 'तिन्ही सांजांची वेळ झाली' असे महणत नाही. तरी 'तिन्ही सांजा' या प्रयोगाला काही संदर्भ आहे का?

■

... आणि समाधान

'तिन्ही सांजा(ज)' हा शब्दप्रयोग 'त्रिसंध्या' ह्या संस्कृत शब्दावरून आला असावा असे डॉ० अशोक केळकर ह्यांनी सुचविले. 'त्रिसंध्या' हा शब्द आपट्यांच्या तीन खंडांच्या संस्कृत-इंग्रजी कोशात (सुधारित आवृत्ती संपा० प्रा० गोडे, प्रसाद प्रकाशन, पुणे, १९७९) आढळतो. पहाट, सायंकाळ ह्या दिवस व रात्रीच्या सीमारेषेवरील दोन संध्या व माध्याह्न ही सकाळ व दुपार ह्यांच्या सीमारेषेवरील संध्या अशा ह्या तीन संध्या. पूर्वी ह्या तीन संध्यासमयी संध्या केली जाई. 'तिन्हीसांज'प्रमाणे 'त्रिकाल' (तिन्ही त्रिकाळ) हाही शब्द रूढ आहे. 'किरकिरती रातकिडे, झाल्या तिन्हीसांजा' ही यशवंतांच्या कवितेतील ओळही एका शब्दकोशात उद्‌धृत केलेली आढळते.

- संपादक

# परिषदेचा वर्धापन-दिन

रंजना फडके

१ मे हा महाराष्ट्रदिन आणि मराठी अभ्यास परिषदेचा वर्धापनदिन. ह्या दोन्हीचे औचित्य साधून मराठी अभ्यास परिषदेने 'मराठी कवितेची बदलती भाषा' ह्या विषयावर एक परिसंवाद आयोजित केला होता.

महाराष्ट्रातील ख्यातनाम कादंबरीकार, समीक्षक, साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त कवी प्रा० वसंत आबाजी डहाके ह्यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या ह्या परिसंवादामध्ये शास्त्रज्ञ व कवी श्री० हेमंत जोगळेकर, भाषा-अभ्यासक व कवी श्री० सलील वाघ, ज्येष्ठ कवयित्री व पुण्याच्या स०प० कनिष्ठ महाविद्यालयाच्या उपप्राचार्य डॉ० नीलिमा गुंडी, पुणे विद्यापीठातील मराठी विभागाचे प्रमुख, समीक्षक व कवी डॉ० मनोहर जाधव हे मान्यवर सहभागी झाले होते.

कार्यक्रमाच्या प्रारंभी मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने ज्ञानपीठ पुरस्कारप्राप्त कविवर्य विंदा करंदीकर आणि भाषाविवेक शिकविणारे ज्येष्ठ समीक्षक डॉ० मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष ह्या अलीकडेच दिवंगत झालेल्या दोघा आदरणीय व्यक्तींना आदरांजली वाहण्यात आली. त्यानंतर मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष प्रा० प्र०ना० परांजपे ह्यांनी परिसंवादात सहभागी होणाऱ्या सर्व मान्यवरांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत केले. त्याचप्रमाणे आपल्या प्रास्ताविकात परिषदेच्या उपक्रमांची माहिती देऊन प्रस्तुत परिसंवादाचा हेतू विशद केला.

कार्यक्रमात सहभागी झालेल्या कविवर्य हेमंत जोगळेकर, सलील वाघ, डॉ० मनोहर जाधव व डॉ० नीलिमा गुंडी ह्यांनी कवितेच्या बदलत्या भाषेसंबंधी असलेल्या आपापल्या भूमिका मांडल्या. कवितेची एकच ठाम भाषा नसते. समाजात होणारे बदल त्यातून व्यक्त होतात, त्यामुळे समाजाच्या स्थितिगतीचा आलेख कवितेतून रेखाटला जातो. भाषा समजून घेताना त्यातील शब्दांमागील अर्थ लक्षात घ्यायला हवा. विद्यार्थीविश्व, कॉर्पोरेट विश्व, तसेच स्त्रीचे बदलते विश्व आणि त्या अनुषंगाने बदलणारी भाषा ह्याची अनेक उदाहरणे देऊन कवितेतील भाषा चाकोरीबाहेर पडते आहे असे प्रतिपादन प्रामुख्याने ह्या प्रसंगी व्यक्त करण्यात आले.

आपल्या अध्यक्षीय मनोगतामध्ये प्रा० डहाके ह्यांनी, बदलत्या काळानुसार कवितेमध्येही भाषांचे वेगवेगळे स्वरूप दिसते आहे. ही कवितेतील भाषासमृद्धी म्हणायची की अतिरेक, असा प्रश्न त्यांनी उपस्थित केला आणि कवींनी सारासार विवेक बाळगला पाहिजे असेही मत व्यक्त केले. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा० रंजना फडके ह्यांनी केले, तर परिसंवादात सहभागी झालेल्या मान्यवरांचा परिचय श्रीमती विजया चौधरी ह्यांनी करून दिला.



5 सायली अपार्टमेंट्स, श्रीरंग सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037
दूरभाष : (020)2421 0985
भ्रमणभाष : 093710 91442
ई-पत्ता : ranjanaphadke2010@gmail.com

परिषद-वार्ता २

## डॉ० वि०बा० प्रभुदेसाई ह्यांच्याबरोबर अनौपचारिक गप्पा

**विजय पाध्ये**

ज्येष्ठ भाषावैज्ञानिक व नागपूर विद्यापीठाचे भूतपूर्व मराठी विभाग प्रमुख डॉ० वि०बा० प्रभुदेसाई हे मूळचे गोव्याचे व सेवानिवृत्तीनंतर मडगाव येथे स्थायिक झालेले. त्यांच्या पुण्याच्या भेटीदरम्यान मराठी अभ्यास परिषदेने दि० २ जून २०१० रोजी अनौपचारिक गप्पांचा एक कार्यक्रम आयोजित केला. आपल्या प्रास्ताविकात परिषदेचे सहकार्यवाह श्री० विजय पाध्ये ह्यांनी, प्रस्तुत कार्यक्रम जरी अनौपचारिक गप्पा ह्या स्वरूपाचा असला तरी महाराष्ट्र शासनाने अलीकडेच जाहीर केलेल्या सांस्कृतिक धोरणाच्या पार्श्वभूमीवर गोवा शासनातर्फे राबविले जाणारे सांस्कृतिक धोरण कशा स्वरूपाचे आहे हे जाणून घेण्याची उपस्थितांची

इच्छा आहे आणि त्या अनुषंगाने माहिती मिळावी अशी अपेक्षा व्यक्त केली.

डॉ० प्रभुदेसाई ह्यांनी उपस्थितांसाठी प्रथम आपल्या आजवरच्या एकूण कारकिर्दीचा थोडक्यात आढावा घेतला. त्यानंतर, गोवा शासन सांस्कृतिक उपक्रमांबाबत अतिशय उदार धोरण ठेवून असल्याचे सांगितले व शासनातर्फे तसेच शासनेतर संस्थांद्वारेही दिल्या जाणाऱ्या विविध पुरस्कारांची माहिती दिली. कला अकादमीतर्फे गोव्याच्या कीर्तीत बहुमोल भर घालणाऱ्या गोमंतक साहित्यिकांना गोमंत शारदा पुरस्कार देऊन गौरविण्यात येते; मराठीतील एक व कोंकणीतील एक (देवनागरी किंवा रोमन लिपीतील) उत्कृष्ट साहित्यकृतीबद्दल लेखकांना प्रत्येकी २५,००० रुपयांचा रोख पुरस्कार दिला जातो. गोमंतक मराठी अकादमीतर्फे मराठी भाषा, साहित्य, नाटक, संगीत, चित्रकला, समीक्षा, संशोधन, प्रकाशन इत्यादी क्षेत्रांतील विविधांगी उपक्रम राबविले जातात. गोवा कोंकणी अकादमीतर्फे कोंकणी साहित्य पुरस्कार, कोंकणी भाषा सेवा पुरस्कार अशा दोन प्रकारचे पुरस्कार दिले जातात. कोंकणी भाषा सेवा पुरस्कार विभागात कोंकणी साहित्यातील लक्षणीय कार्य केलेल्या ४० वर्षे वयापर्यंतच्या दोन व्यक्तींना प्रत्येकी १५,००० रुपयांचे, तर शणे गोंयबाब कोंकणी भाषा सेवा पुरस्कार व माधव मंजुनाथ शानभाग कोंकणी भाषा सेवा पुरस्कार हे कोंकणी भाषेच्या विविध क्षेत्रांतील बहुमोल योगदानासाठी ५० वर्षे वयापुढील व्यक्तींना प्रत्येकी २५,००० रुपयांचे रोख पुरस्कार दिले जातात. शिवाय, कोंकणी भाषेसाठी लक्षणीय काम करणाऱ्या संस्थेस २५,००० रुपयांचा कोंकणी भाषा सेवा संस्था पुरस्कार दिला जातो. एकंदरीत, साहित्यसंशोधनाच्या कार्यास प्रोत्साहन देणे हाही गोवा शासनाच्या सांस्कृतिक धोरणाचा महत्त्वाचा भाग असल्याचे दिसून येते असे त्यांनी सांगितले.

गोवा शासनाच्या कला व संस्कृती संचालनालयाची कामगिरीही लक्षणीय असल्याचे सांगून डॉ० प्रभुदेसाई ह्यांनी काही तपशील पुरवले. भारतीय अभिजात संगीत, गायन, वादन, नृत्य, नाट्यक्षेत्र, 'तियात्र' (ख्रिस्ती कलाकारांची रंगभूमी), चित्रकला, लोककला, छायाचित्रण, कोंकणी व मराठी साहित्य, कीर्तन, भजन, हस्तकला वगैरे क्षेत्रांत लक्षणीय कामगिरी करणाऱ्या गोमंतकीय नागरिकांना उत्तेजन देण्याच्या उद्देशाने संचालनालयातर्फे दरवर्षी १६ राज्य सांस्कृतिक पुरस्कार, ८ युवा सृजन पुरस्कार (नवसर्जन चेतना पुरस्कार), एक उत्कृष्ट सांस्कृतिक संस्था पुरस्कार, ६० कला गौरव पुरस्कार असे विविध पुरस्कार देण्यात येतात. शिवाय, राज्य पातळीवरील एक उत्कृष्ट वाचनालय पुरस्कार व एक उत्कृष्ट ग्रंथपाल पुरस्कार देण्याचीही तरतूद करण्यात आली आहे. शासनातर्फे

गोमंतकीय थोर सुपुत्र व आंतरराष्ट्रीय कीर्तीचे अणुशास्त्रज्ञ डॉ० अनिल काकोडकर ह्यांना गोमंत-विभूषण २०१० असा किताब देऊन अलीकडेच गौरविण्यात आले.

कार्यक्रमाच्या शेवटी परिषदेच्या उपाध्यक्ष डॉ० मृणालिनी शहा ह्यांनी सदर कार्यक्रमाद्वारे अतिशय उद्बोधक माहिती दिल्याबद्दल डॉ० प्रभुदेसाईंचे आभार मानले व डॉ० कल्याण काळे ह्यांनी पुष्पगुच्छ देऊन त्यांचा सन्मान केला.

4 चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037
दूरभाष : (020)2441 1951
भ्रमणभाष : 098220 31963
ई-पत्ता : v.wordsmith@gmail.com

**परिषद-वार्ता ३**

# देणग्या

**आनंद काटीकर**

परिषदेला पुढील व्यक्ती/संस्थांकडून देणग्या मिळाल्या आहेत. मराठी अभ्यास परिषद देणगीदारांची आभारी आहे.

डॉ० लीला दीक्षित ... रु० ५०००/-

डॉ० कैलास सार्वेकर ... रु० १०००/- (१० व्यक्तींना अंक एक वर्ष पाठविण्यासाठी)

रामचंद्र दत्तात्रय प्रतिष्ठान ... रु० २२५०/- (१२ शाळांना अंक एक वर्ष पाठविण्यासाठी)

अरविंद कोल्हटकर, कॅनडा ... रु० ४००/-











## लेखक परिचय

- **कोल्हटकर** अरविंद : पुणे विद्यापीठातून गणित या विषयात एम्०ए० पदवी (१९६४). रशियन भाषेचे प्रमाणपत्र व पदविका प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण (१९६५). केंद्रीय लोकसेवा आयोगाची परीक्षा उत्तीर्ण (१९६५). आयकर विभागातून आयुक्त पदावरून स्वेच्छानिवृत्ती. बॉम्बे स्टॉक एक्स्चेंजचे चिटणीस म्हणून काही काळ काम. आता टोरांटो (कॅनडा)मध्ये स्थायिक. भारतीय भाषा व संस्कृती या विषयांवर विविध संकेतस्थळांवर प्रसंगोपात्त लेखन. kolhatkar.org हे स्वत:चे संकेतस्थळ.

- **खैरे विश्वनाथ** : केंद्रीय बांधकाम खात्यांतून मुख्य अभियंता म्हणून निवृत्त. संस्कृत, मराठी व तमिळ ('संमत') या भाषांच्या परस्परसंबंधांचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांसंबधी लेखन. पुस्तकांना शासनाची पारितोषिके.

- **गुंडी (डॉ०) नीलिमा** - स०प० कनिष्ठ महाविद्यालयात उपप्राचार्य, कविता, ललित व वैचारिक लेख, समीक्षा, संपादन ह्या प्रकारांतील बारा पुस्तके प्रकाशित. लेखनाबद्दल दोन राज्यपुरस्कार. 'लाटांचे मनोगत' हे स्त्रीकाव्याचा चिकित्सक अभ्यास करणारे पुस्तक. 'कविता विसाव्या शतकाची' व 'भारतीय भाषांतील स्त्रीसाहित्याचा मागोवा (खंड १ व २)' ह्यांच्या संपादनात सहभाग. राज्यस्तरीय, राष्ट्रीय चर्चासत्रांमधून निबंध सादर. सुमारे पाचशे पुस्तकांचे परीक्षण.

- **जोगळेकर** हेमंत गोविंद : मुंबई आयआयटीमधून रासायनिक अभियांत्रिकीमध्ये पदवी. राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा, पुणे येथून वरिष्ठ शास्त्रज्ञ म्हणून निवृत्त. 'होड्या' (१९८५), 'माझा(पण) बेहद्द नाममात्र घोडा' (विडंबन कविता), 'मनातले घर' (१९९५), 'उघडे पुस्तक' (२००७), हे कवितासंग्रह प्रकाशित. केशवसुत व बालकवी पुरस्कार. इंग्रजी, हिंदी, उर्दू, गुजराती, कन्नड, पंजाबी व असमिया इ० भाषांत कवितांची भाषांतरे. 'कविता दशकाची', कविता विसाव्या शतकाची', 'स्वातंत्र्योत्तर मराठी कविता - १९६० ते ८०' व 'अक्षर दिवाळी - १९८०, ८१, ८२, ८३, ८४, ८५' या प्रातिनिधिक संग्रहात कवितांचा समावेश.

- **देव (डॉ०) विजया** : भाषाविज्ञानात एम०ए०,पीएच०डी०, मराठीमध्येही एम०ए०, पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात अधिव्याख्याता. दोन अनुवादित व एक संपादित अशी तीन पुस्तके प्रकाशित. अंधांसाठी मराठी साहित्यकृतींचे ध्वनिमुद्रण. ललित व संशोधनपर लेखन.

- **देवळेकर**, सुशान्त : एम०ए० (मराठी), सध्या राज्य मराठी विकास संस्था (मुंबई) येथे कनिष्ठ संशोधन-साहाय्यक ह्या पदावर कार्यरत. २००२-०८ ह्या काळात भारतीय तंत्रज्ञान संस्था (आयआयटी) (मुंबई) येथील भारतीय भाषा केंद्रात भाषातज्ज्ञ म्हणून सेवेत. मराठी शाब्दबंध हा शब्दार्थसंबंध दाखवणारा कोश, मराठी शब्दरूपांचे विश्लेषण करणारी रूपविश्लेषक ही संगणक प्रणाली विकसित करण्यात सहभाग. संगणकावर युनिकोड वापरून मराठीत काम कसे करता येईल हे समजावून देणाऱ्या कार्यशाळांत मार्गदर्शन.



अनुक्रमणिका

- **देशपांडे** (डॉ०) ब्रह्मानंद : महामहोपाध्याय, विद्याभूषण, प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित.

- **परांजपे** (प्रा०) प्र०ना० : एम०ए०,पी०जी०डी०टी०इ०,एम०लिट० रामनारायण रुइया महाविद्यालय, मुंबई येथे इंग्रजीचे १५ वर्षे आणि पुणे विद्यापीठात वृत्तपत्र-विद्येचे २० वर्षे अध्यापन. एक कथासंग्रह, तीन भाषांतरे, पाच संपादने, पाच सहसंपादने व एक सहलेखन अशी १५ पुस्तके प्रकाशित. याव्यतिरिक्त दहा पुस्तकांत लेख समाविष्ट. संगीत नाटक स्पर्धेत लेखनाबद्दल महाराष्ट्र शासनाचे प्रथम पारितोषिक.

- **पाध्ये** विजय : पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८पासून उद्योग समूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन. अभियांत्रिकी, मानव संसाधन, औद्योगिक संबंध, विकृतिशास्त्र, दूरसंचार इ० क्षेत्रांतील इंग्रजीतील दस्तऐवजांचे मराठीत भाषांतर करण्याचा व्यवसाय.

- **फडके** रंजना : वाडिया महाविद्यालयात अध्यापन. कवयित्री. अनेक संस्थांमध्ये सहभाग.

- **बर्नसन** (डॉ०) मॅक्सीन : अमेरिकेत जन्म, भारतीय नागरिकत्व. 'फलटणमधील मराठी' या विषयावर पेन्सिल्वानिया विद्यापीठाची भाषाविज्ञानातील पीएच०डी० (१९७३). जाई निंबकर यांच्या सहकार्याने विदेशी विद्यार्थ्यांसाठी मराठीची दहा पुस्तके. फलटण येथील 'प्रगत शिक्षण संस्थे'च्या संस्थापक व संचालक. साने गुरुजी, पाध्ये, पद्मजा, राणी बंग इ० पुरस्कारांच्या मानकरी.

- **भामरे** प्रकाश अर्जुन : एम०ए०,बी०एड०,एम०फिल०, सेट व नेट परीक्षा उत्तीर्ण. मराठी विभागप्रमुख, ग०तु० पाटील महाविद्यालय, नंदुरबार. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळाचे सभासद. प्रथम व द्वितीय वर्ष, कला आणि प्रथम वर्ष, वाणिज्य यांसाठीच्या पाठ्यपुस्तक संपादन मंडळांचे सभासद.

- **मोहनी** दिवाकर : मुद्रणतज्ज्ञ, लिपीतज्ज्ञ. विवेकवादाला वाहिलेल्या 'आजचा सुधारक' ह्या नियतकालिकाच्या संपादक-मंडळाचे सदस्य.

- **वाघ** सलील : बंगळुरू व मुंबई येथील काही जाहिरात कंपन्यांमध्ये स्टूडियो मॅनेजर म्हणून व 'स्प्रिंगर' ह्या आंतरराष्ट्रीय प्रकाशनगृहात विभाग-प्रमुख म्हणून नोकरी केल्यानंतर आता संगणकीय मुद्रायोजन व तांत्रिक सेवा देण्याच्या स्वतंत्र व्यवसायात. 'रेसकोर्स आणि इतर कविता'सह एकूण चार कवितासंग्रह प्रकाशित. शमशेर बहादूर सिंह ह्यांच्या हिंदी कवितांचा मराठीत परिचय करून देणारे पुस्तक प्रकाशित. अनुष्टुभ, कवितारती, परिवर्तनाचा वाटसरू, नवाक्षरदर्शन, खेळ, कालनिर्णय ह्यांसह अनेक नियतकालिकांतून व वर्तमानपत्रांतून कविता प्रसिद्ध. २००६चा पहिला 'शब्दवेध' सन्मान प्राप्त. कवितांचे इंग्रजी, हिंदी व मणिपुरी भाषांत अनुवाद प्रसिद्ध. रॅडिकल ह्यूमनिस्ट चळवळीशी संबंधित.

- **सामंत** मेघना : सर जे०जे० उपयोजित कलासंस्थेमधून पदवी. गेली पाच वर्षे ग्रामीण भागातील मुलांच्या आणि प्रौढांच्या अनौपचारिक शिक्षणासाठी विविध माध्यमांत शैक्षणिक साहित्याची निर्मिती. त्याआधी सात वर्षे प्रसार माध्यमांत पत्रकार.



